प्रकाशक:
शंकर
वामन
कुलकर्णी
महाराष्ट्र
ग्रंथ भांडार
मुंबई ४

आवृत्ति
पहिली
१९४६

किंमत
अडीच
रुपये

मुद्रक:
वसंत
केशव
पडवळ
प्रदीप
प्रिंटिंग प्रेस
विजयनगर
दादर १४

## प्रकरण १ ल.

पावणे अकराला सर्व कारभार आटोपला. शत्रूंनी शहरांत प्रवेश केला, शहराचं संरक्षण करणारांचा पराभव झाला, व लढाई संपली. जंगी मोहिमे-प्रमाणंच शत्रूनं या छोट्या मोहिमेची काळजीपूर्वक तयारी केली होती. या रविवारीं सकाळीं पोस्टमन आणि पोलिस दोघेही, शहरांतील स्टोअर्सचा सुप्रसिद्ध मालक, मि. कोरेल यांच्या होडींत बसून, मासे मारायला गेले होते. त्या दिवसापुरती त्यानं आपली होडी त्यांच्या हवालीं केली होती. पोस्टमन व पोलिस समुद्रांत कितीतरी लांब गेल्यावर, त्यांना शिपायांनीं भरलेल्या काळ्या छोट्या होडया शांतपणं येतांना दिसल्या. ते शहरांतील अधिकारी असल्यानं, या होडयांचा तपास करणं हें त्यांचंच काम; म्हणून त्यांनीं आपली होडी वळवली, पण ते बंदराला येऊन लागण्याच्या आंतच, शत्रूच्या तुकडीनं शहराचा ताबा घेतला होता. इतकंच काय पण या दोघांना टाऊन हॉलमधील खुद्द त्यांच्या कचेरींत जायला मिळेना, व त्यांनीं जेव्हां आपला हक्क बजाव-ण्याचा हट्ट धरला, तेव्हां त्यांना युद्धकैदी म्हणून गिरफदार करण्यांत येऊन शहरांतील तुरुंगांत डांबण्यांत आलं.

शहरांतील स्थानिक शिपाई एकूण बारा. पण स्टोअर्सचा मालक मि. कोरेल यानं, या रविवारीं सकाळीं, त्यांना जेवणखाण पुरविलं, काडतुसं, निशाणं दिलीं, व नेमबाजीच्या शर्यतीसाठीं बक्षिसं पुरविलीं, एवढंच काय परंतु, सहा मैल लांब, टेंकडयांच्या मागं असलेली आपल्या मालकीची रानांतील निसर्गरम्य मोकळी जागासुद्धां दिली. स्थानिक शिपाई, शरीरानें उंचनिंच, मजबूत पण निर्धास्त व कपडयांच्या बाबतींत थोडेफार निष्काळजी होते.

त्यांनीं विमानांची घरघर ऐकली, पॅराशूट खालीं येतांना पाहिल्या व ते तडक शहरांत धांवत आले. शहरांत येतात, तों रस्त्याच्या दुतर्फा मशीनगन्स लावून ठेवलेल्या. या शिपायांना लढाईचा व त्यांतल्यात्यांत पराभवाचा बिलकूल अनुभव नसल्यानं, त्यांनीं गोळ्या झाडल्या. क्षणमात्र मशीनगन्स खटखटल्या. सहाजण तावडतोब ठार झाले, तीन जबर जखमी झाले व तिघे बंदुकांनिशीं टेंकडयांत पळून गेले.

साडेदहाच्या सुमारास शत्रूचा पितळी बँड, शहरांतील चौकांत, मधुर गाणीं वाजवीत होता. शहरांतील नागरिक, आश्चर्यानें आ वासून, व चकित होऊन संगीत ऐकत होते, व हातांत सब-मशीन-गन घेऊन फिरणाऱ्या राखी पोलादी टोप्या घातलेल्या शिपायांकडे रोखून पहात होते.

दहा-अडतीसच्या सुमारास, बंदुकीच्या गोळ्याना बळी पडलेल्या सहा-जणांना पुरण्यांत आलं; पॅराशूटच्या घडया घालून झाल्या; ती तुकडी मि० कोरेलच्या धक्याजवळील वखारींत उतरण्यास गेली. या ठिकाणीं एका सबंध तुकडीला पुरतील इतक्या कॉटस् व ब्लँकेटस्, व्यवस्थित लावून ठेवलेलीं होती.

"कर्नल लॅन्सर याला भेट देण्यांत यावी," अशी औपचारिक विनंती वयोवृद्ध मेयर ऑर्डन याला पावणे अकराच्या सुमारास करण्यांत आली. ही भेट मेयरच्या पाच खोल्यांच्या वाडयांत होणार असून, भेटेची वेळ बरोबर अकरा अशी मुक्रर करण्यांत आली.

राजवाडयाचा दिवाणखाना प्रशस्त व सुंदर होता. दिवाणखान्यांतील मढविलेल्या खुर्च्यांची जुनाट अस्तरं फाटलीं होतीं व त्या, अशा कांही एकाला एक लावून ठेवल्या होत्या कि जणूं कांहीएक काम नसलेले पुष्कळसे नोकर-चाकरच खडे आहेत. जवळच विस्तव ठेवायची, कमानदार, संगमरवरी दगडांची जागा होती. तिथं आंत लहानशा शेगडींत रसरशीत निखारे असून जवळच कोळशाचा डबा होता. त्यावर हातानं चित्रं काढलेलीं होती. फळीवर मोठालीं पुष्पपात्रं असून, मोठं चिनी मातीचं घडयाळ होतं, घडयाळावर धडपडणाऱ्या लहान लहान देवदूतांची चित्रं काढलेलीं दिसत होतीं.

दिवाणखान्याच्या भिंतीवर लालभडक रंगाचा कागद लावला असून त्यावर सोनेरी आकृति काढल्या होत्या; लांकूडसामान पांढरंशुभ्र, सुंदर स्वच्छ होतं. घाबरलेल्या पोरांपुढं, अचाट शौर्यानं मोठाले कुत्रे उभे आहेत, अशीं चित्रं भिंतीवर रंगविलेलीं होती.

शेगडीपाशीं दाढीवाला, म्हातारा डॉक्टर विंटर बसला होता. याचा पोशाख साधा असून त्याची मुद्रा सात्विक होती. हा डॉक्टर असून शिवाय शहरांतील नव्याजुन्या लहानसहान घडामोडींची जणूं चालता बोलता इतिहासच होता. आश्चर्यानं पहात असतां, त्याचा मांडीवरील हाताचे आंगठे फिरवायचा चाळा चालू होता. डॉक्टर विंटर इतका साधा होता कीं एकाद्या गंभीर माणसालाच, हा गंभीर आहे हें कळलं असतं. आंगठे फिरवायचा आपला चाळा, मेयरचा नोकर जोसेफ, याच्या लक्षांत आला कीं काय हें पहाण्यासाठीं, त्यानं जोसेफकडे पाहिलं.

"काय अकरा वाजतां ?" डॉक्टर विंटरनं विचारलं.

"होय. चिठींत अकराची वेळ दिली आहे." जोसेफनं लक्ष न देतां उत्तर दिलं.

"तूं चिठी वाचलीस ?"

"नाहीं. मेयरसाहेबांनी मला वाचून दाखविली."

एवढं बोलून जोसेफ खुर्च्यांकडे वळला. मागच्या वेळीं आपण खुर्च्या लावून ठेवल्या त्यानंतर त्या हालल्या आहेत कीं काय हें तो पहात होता. जोसेफ संवयीप्रमाणं फर्निचरकडे पाहून रागीट मुद्रा धारण करी, जणूं कांहीं तें, उर्मट, फाजील, व मळकं बनलं असावचं कदाचित! जगांत मेयर ऑर्डेन लोकांचा पुढारी होता, तर जोसेफ, फर्निचर, चांदीची भांडी, व पेलेबशा यांचा पुढारी होता. जोसेफ हा वयोवृद्ध असून शरिरानं किरकोळ पण गंभीर वृत्तीचा होता. त्याचं जीवन इतकं गुंतागुंतीचं होतं कीं गंभीर माणसालाच, त्याचा साधेपणा जाणतां आला असता. डॉक्टर विंटरच्या आंगठे फिरविण्याच्या चाळ्याचं, त्याला आश्चर्य वाटलं नाहीं, पण चीड आली. शहरांत परके शिपाई काय घुसले, आपले शिपाई ठार काय झाले, पकडले काय गेले!

शहरांत कांहींतरी महत्वाचं घडत आहे, अशी जोसेफला शंका आली. आज ना उद्यां या सगळ्या घटनेबाबत जोसेफला मत बनवायला लागणार. डॉक्टर विंटरनं आपली खुर्ची इंचभर पुढं ओढली; हा, खुर्ची पुन्हा होती तिथं केव्हां ठेवतो याची जोसेफ वाट पहात होता.

डॉक्टर विंटर पुनः म्हणाला. " अकरा ! मग ते सुद्धां इथें येणार ! जोसेफ, मोठे वक्तशीर दिसतात हे लोक "

त्याच्याकडे दुर्लक्ष करून जोसेफ उत्तरला " होय. "

" वक्तशीर लोक " डॉक्टर पुनः एकवार म्हणाला.

" होय. "

" वक्तशीर आणि यंत्रशीर. "

" होय. "

" आपल्या भवितव्याकडे ते इतक्या घाईनं धांवतात, कीं जणूं ते थांबायला तयार नाहींत. आपल्या खांद्यांनी धक्के मारून ते फिरती दुनिया पुढं ढकलतात. "

" होय, होय " म्हणण्याचा कंटाळा आल्यानं, जोसेफ म्हणाला, " बरोबर आहे. "

जोसेफला संभाषणाची ही पद्धत आवडली नाहीं. कारण या संभाषणानं, कोणत्याही विषयावर मत बनविण्याच्या कामीं त्याला मदत झाली नसती. समजा, त्यादिवशीं तो जर सैंपाकणीला म्हणाला असता, " ॲनी, वक्तशीर आहेत बरं हे लोक. " त्याचा काय उपयोग झाला असता? ॲनीनं विचारलं असतं. " कोण लोक ! कशावरून? " आणि शेवटीं म्हणाली असती, " वेड लागलंय् तुला, जोसेफ. " डॉक्टर विंटर जें कांहीं बोलत असे, तें त्यानं खालीं जाऊन ॲनीला कित्येक वेळां सांगितलं असेल, ॲनीला नेहमींच ते वेडगळपणाचं वाटे.

डॉक्टर विंटरनं, आंगठ्याकरून दृष्टि वळवून, जोसेफ खुर्च्या सारख्या करीत होता, त्याच्याकडे पाहून विचारलं " मेयरसाहेब काय करताहेत ? "

" कर्नलचं स्वागत करण्यासाठीं पोशाख चढवीत आहेत. "

" आणि तूं इथंच ? तूं नाहीं त्यांना मदत करीत ? त्यांनीं स्वतःच कपडे घातले तर ते गबाळ्यासारखे दिसतील. "

" मादाम त्यांच्या मदतीला आहेत. त्यानीं रुबाबदार दिसावं, असं मादामनां वाटतंय्. "

" मादाम— " जोसेफ जरा लाजून म्हणाला. " त्यांच्या कानावरचे केंस कातरीत आहेत. कापतांना हुळहुळतं, म्हणून साहेब मला हात लावूं देत नाहींत. "

" हुळहुळतंच मुळीं " डॉक्टर विंटर म्हणाला.

" पण केंस कापलेच पाहिजेत, असा मादामचा हट्ट आहे. "

डॉक्टर विंटर एकदम हंसला. चटकन् उठून त्यानं आपले हात शेकण्यासाठीं विस्तवाजवळ धरले. लगेच टुणकन् उडी मारून जोसेफनं खुर्ची नेहमीच्या जागीं सरकून ठेवली.

" काय आश्चर्य आहे आपल्या लोकांचं ? " डॉक्टर विंटर म्हणाला, " आमचा देश रसातळाला चाललाय्, आमचं शहर शत्रूनं जिंकलय्, मेयर जिंकणाराचं स्वागत करायच्या तयारींत आहे, आणि त्याची बायको, त्याची मुंडी दाबून, त्याच्या कानावरचे केंस कातरीत आहे. "

" त्यांचे कान फार केंसाळ दिसायला लागले होते," जोसेफ बोलूं लागला. " कानच काय, भुंवयासुद्धां झुपकेबाज झाल्या आहेत. कानावरच्या केंसापेक्षां, भुंवयांच्या केंसांनी, साहेब फार बेचैन होतात. फार त्रास होतो म्हणतात मादामलासुद्धां भुंवया कातरायचं जमेल कीं नाहीं, शंकाच आहे. "

" ती करील खटपट, " डॉक्टर विंटर म्हणाला.

" ते रुबाबदार दिसावे असं मादामनां वाटतं. " जोसेफ म्हणाला.

दाराजवळील खिडकीच्या कांचेच्या तावदानांतून, पोलादी टोपी घातलेल्या इसमान आंत डोकावून पाहिलं; जरा वेळानं दार ठोठावल्याचा आवाज आला. खोलींतील किंचित उष्णतामय प्रकाश नाहींसा होऊन, करड्या रंगाचा उजेड त्या जागीं पसरला, असा भास झाला.

डॉक्टर विंटरनं घड्याळाकडे पहात म्हटलं, " ते लौकरच आले आहेत. जोसेफ दार उघड पाहूं." जोसेफनें दार उघडलं. लांब कोट घातलेला एक शिपाई आंत आला. त्याच्या डोक्यांत पोलादी टोपी असून खांद्यावर सब-मशीन–गन होती. त्यानं आसपास नजर फिरविली व बाजूला झाला. त्याच्या-मागं, दारांत एक ऑफिसर उभा होता. त्याचा युनिफॉर्म साधा असून, फक्त खांद्यांवर त्याचा हुद्दा दर्शविणारी फीत होती.

ऑफिसरनं आंत येऊन डॉक्टर विंटरकडे पाहिलं. हा ऑफिसर म्हणजे एकाद्या इंग्लिश खानदानी गृहस्थाचा अतिशयोक्तिपूर्ण पुतळाच! त्याला एका बाजूला मान वळविण्याची संवय असून त्याचा चेहरा लालबुंद होता; नाक जरा लांब व नजरेंत भरण्यासारखं होतं. पुष्कळशा ब्रिटिश जनरल ऑफिसर्सप्रमाणं, त्याला लष्करी पोशाखांत कसंसंच वाटत होतं. दारांत उभा राहून तो डॉक्टर विंटरकडे रोखून पहात होता. शेवटीं त्यानं प्रश्न केला.

" आपणच मेयर ऑर्डन काय?"

डॉक्टर विंटरनं स्मित करून म्हटलं. "छेः छेः! मी नाहीं मेयर ऑर्डन."

" मग, अधिकारी आहांत?"

" छेः! मी या शहरांतला डॉक्टर असून, मेयरचा स्नेही आहे."

त्या ऑफिसरनं विचारलं, " मेयर ऑर्डन कुठं आहेत?"

" आपल्या भेटीसाठीं पोशाख करीत आहेत. आपण कर्नल असाल?"

" नाहीं, मी कर्नल नाहीं. माझं नांव कॅप्टन बेंटिक," असं म्हणून, डॉक्टरकडे पाहून त्यानं किंचित् मान लवविली. डॉक्टर विंटरनं पण किंचित् मान लवविली.

कॅप्टन बेंटिकनं पुढं बोलायला सुरुवात केली. आपल्याला काय बोलायचं आहे याचा जाणीवेनंच कीं काय, त्याला बोलतांना थोडी पंचाईत पडत होती. " लष्करी नियमांप्रमाणें, कमांडिंग ऑफिसर आंत शिरायच्या आधीं, आम्हीं खोलीचा हत्यारांसाठीं झाडा घेतों. यांत आपला अपमान करण्याची इच्छा नाहीं." मागं वळून त्यानं, " सार्जंट," अशी हाक मारली.

सार्जंटनं पुढ होऊन, जोसेफचे खिसे चांचपून म्हटलं, " कांहीं नाहीं."

कॅप्टन बेंटिक, डॉक्टर विंटरला म्हणाला, " माफ करा, पण आपली सुद्धां झडती घ्यायची आहे."

सार्जेटनं डॉक्टर विंटरचे खिसे चांचपले. त्याचा हात आंतल्या कोटाच्या खिशावर स्थिरावला. त्यानं खिशांत हात घालून, लहानशी, चपटी, काळया चामड्याची पिशवी काढून, ती कॅप्टन बेंटिकला दिली कॅप्टननं ती उघडली, त्यांत, लांब चाकू, सुया इत्यादि शस्त्रक्रियेचीं हत्यारं होतीं. पिशवी बंद करून त्यानं ती डॉक्टर विंटरला परत दिली.

डॉक्टर विंटर म्हणाला, "हें पहा, मी आहे खेड्यापाड्यांतून फिरणारा डॉक्टर. वेळेवर सुरी मिळेना, म्हणून मला एकदां स्वयंपाक घरांतील सुरी वापरायला लागली. तेव्हांपासून मी ही हत्यारं नेहमीं जवळ बाळगतों " लहानशी कातडी कव्हरची वही उघडीत, कॅप्टन बेंटिकनं विचारलं, " यांत पिस्तुल असायचं ? "

डॉक्टर विंटर उद्‌गारला, " तुमची व्यवस्था कडेकोट आहे."

" हं, आमचा स्थानिक इसम, इथं काही दिवस तयारी करीत होता."

" मला वाटतं तुम्ही त्या इसमाचं नाव सांगणार नाहीं. " डॉक्टरनं म्हटलं.

" त्याचं काम आतां संपलं आहे, तेव्हां आतां त्याचं नांव सांगायला हरकत नाहीं. त्याचं नांव मि. कोरेल. "

डॉक्टर विंटर आश्चर्य चकित होऊन उदगारला, " काय, जॉर्ज कोरेल ! छे अशक्य ! त्यानं या शहरासाठीं कितीतरी गोष्टी केल्या आहेत. कां टेंकडींतील आज सकाळच्या नेम मारण्याच्या शर्यतीसाठीं सुद्धां, त्यानं बक्षिसं दिलीं. अस्सं, अस्सं ! म्हणून हा निशाण बाजीचा सामना ठेवण्यांत आला होता वाटतं ! आलं लक्षांत. पण जॉर्ज कोरेल, छे. अजून आपला यावर विश्वास बसत नाहीं ! "

डाव्या बाजूचं दार उघडलं गेलं, मेयर ऑर्डन आला. येतांना तो उजव्या कानांत बोट घालून खाजवीत होता. तो आपल्या अधिकारी पदाच्या पोशाखांत असून, मेयरचा हुद्दा दर्शविणारी सांखळी त्याच्या गळ्यांत होती.

त्याच्या मिशा लांब पांढऱ्या व पसरलेल्या होत्या. त्याचे पांढरे शुभ्र केंस नुकतेच चापूनचोपून बसविलेले असल्यानं, आतां पुनः ते उभे राहायला लागले होते. तो आज इतके वर्षे शहराचा मेयर होता कीं " मेयर " हा शद्व, ही कल्पना, त्याच्याशीं निगडित, झाली होती. मोठाल्या माणसांनीं सुद्धां " मेयर " हा शद्व, छापलेला किंवा लिहिलेला पाहिला, कीं त्यांच्या मनचक्षूसमोर मेयर ऑर्डनची मूर्ति चमकूं लागे " मेयर " शब्दाची तो मूर्त-कल्पना होता. तो व त्याचं अधिकारस्थान एकात्म झालं होतं. अधिकार पदानं त्याला थोरपणा दिला होता, तर त्यानं अधिकार पदाला माणुसकीची जोड प्राप्त करून दिली होती.

त्याच्या मागोमाग त्याची पत्नी आली. ती शरीरानं किरकोळ असून, आंगाला सुरकुत्या पडलेली, परंतु दिसायला उग्र होती. उभ्या आयुष्यांत फक्त एक दोन वेळांच तिला त्याचा स्वभाव कळला होता पण त्याच्या स्वभावाचा जो भाग कळला होता तो मात्र अगदीं पूर्णपणं. त्याचं कांहीं दुखतखुपत असलं, जेवण थोडं कमीं झालं, वागण्यांत हलकेपणा किंवा निष्काळजीपणा असला, तरी तो तिच्या नजरेंतून चुकत नसे; परंतु त्याचे विचार, ध्येय वा आकांक्षा, तिला कधीं कळूं शकल्या नाहींत. आंगठा चोखणाऱ्या मुलाचा आंगठा तोंडातून बाहेर काढावा त्याप्रमाणं तिनं मेयरपाशीं जाऊन त्याचं बोट कानांतून बाहेर काढलं, व हात बाजूला सारला.

" तुम्हीं म्हणतां तितकं खुपत असेल असं नाहीं वाटत मला. " नंतर ती डॉक्टर विंटरला म्हणाली, " मला भुवयांना हात लावूं देत नाहीं. "

" अग पण दुखतं ना, " मेयर ऑर्डन म्हणाला.

" बरं तुम्हांला तसंच राह्यचं असलं तर त्याला मी काय करणार ! " अगोदरच सरळ असलेली त्याची नेकटाय तिनं आणखी ओढून सरळ केली. डॉक्टर विंटरला ती म्हणते, " डॉक्टर तुम्ही आहांत इथं हें बरं आहे. कितीजणं येतील तुम्हांला वाटतं ? " इतक्यांत तिचें लक्ष कॅप्टन बेंटिककडे जाऊन ती उद्‌गारली; " कर्नल ? " कॅप्टन बेंटिकनें उत्तर दिलं. " नाहीं, मादाम मी कर्नल नाहीं. कर्नल येण्याची तयारी करण्यासाठीं मी आलोंय. सार्जंट !–"

सार्जंट, उशा उलटून पहात होता, चित्रांच्या मागं कांहीं लपविलं आहे कीं काय हें तपाशीत होता. तो एकदम पुढं आला, व त्यानं मेयर ऑर्डनचे खिसे चांचपून पाहिले.

कॅप्टन बेंटिक म्हणाला, "माफ करा महाराज, लष्करी नियम आहे हा."

कॅप्टननं हातांतील छोट्या वहीकडे पहात म्हटलं, "मेयर साहेब, इथं दोन बंदुकी आहेत." मेयरनं उत्तर दिलं, "बंदुकी! हं छोट्या बंदुकी! होय, माझ्यापाशीं एक शॉटगन व एक शिकारीची बंदुक आहे." तो म्हणाला, "कॅप्टन साहेब, मी आतांशा फारसा शिकारीला जात नाहीं. जाईन जाईन म्हणतों, हंगाम सुरू होतो पण मी घराबाहेरच पडत नाहीं. माझा शिकारीचा षोक कमी होत चालला आहे." परंतु कॅप्टन बेंटिक, त्या बंदुकींचा मुद्दा सोडायला तयार नव्हता. "मेयर साहेब, कुठं आहेत त्या बंदुकी?" मेयरनं गाल चोळीत विचार करून पाहिलं. "मला वाटतं"— बायकोकडे वळून तो म्हणाला "कायग, बेडरूममधील कपाटांत हातांत धरायच्या काठ्या नि बंदुका आहेत ना?"

मादाम म्हणाल्या "होय तिथंच आहेत कपाटांतील प्रत्येक कपड्याला तेलाची घाण यायला लागलीय्. कुठंतरी दुसरीकडे ठेवल्या असत्या तर बरं झालं असतं."

कॅप्टननं हांक मारली. "सार्जंट!" सार्जंट बेडरूमकडे धांवला.

"मला वाईट वाटतं-पण हें कटु कर्तव्य आहे." कॅप्टन म्हणाला.

एक दुबारी शॉटगन व खांद्याला अडकवायचा पट्टा असलेली, सुंदरशी शिकारीची बंदुक घेऊन, सार्जंट खोलींत आला. दाराला त्यानं बंदुकी टेंकून ठेवल्या.

कॅप्टन बेंटिक म्हणाला, "अच्छा! थँक्स, मेयरसाहेब. थँक यू मादाम."

तो उठला व डॉक्टर विंटरकडे वळून, अभिवादन करण्यासाठीं म्हणून त्यानं किंचित् मान लवविली. "थँक यू डॉक्टर. कर्नल लँन्सर तडक इथं येतील गुड मॉर्निंग!"

असं म्हणून तो पुढच्या दाराकडे गेला. एका हातांत दोन बंदुकी घेतलेल्या व उजव्या खांद्यावर सब-मशीन-गन, अशा थाटांत सार्जंट त्याच्या मागोमाग गेला.

ते बाहेर गेल्यावर मादाम म्हणाली. "पहिल्याप्रथम मला वाटलं कीं हाच कर्नल. चांगला होता दिसायला."

डॉक्टर विंटर कुत्सितपणं म्हणाला, "छे तो कर्नल नाहीं तर कर्नलचं, संरक्षण करणारा होता."

मादाम विचार करूं लागली. किती ऑफिसर्स येतील कुणास ठाऊक? तिनं जोसेफकडे पाहिलं तों, तो निर्लज्जपणं चोरून, त्यांचं संभाषण ऐकत होता. तिनं कपाळाला आंठ्या चढविल्या व त्याच्याकडे पाहून मान हलविली. त्यासरशीं तो पुनः एकवार खुर्च्या झटकूं लागला.

तिनं विचारलं, "किती ऑफिसर्स येतील असं तुम्हांला वाटतं?"

डॉक्टर विंटरनं बेधडक एक खुर्ची पुढं ओढून बसत म्हटलं. "मला नाहीं ठाऊक."

ती जोसेफकडे पाहून म्हणाली, "आम्हीं विचार करीत होतों कीं त्यांना चहा द्यावा कीं दारू द्यावी? समजा द्यायचं म्हटलं, तर कितीजण येणार हें कळत नाहीं, बरं समजा दिलं नाहीं तर काय करायचं?"

डॉक्टर विंटर डोकं हलवून हंसत हंसत म्हणाला, "खरं सांगायचं म्हणजे, बरेच दिवसांत आपण कुणाला जिंकलं नाहीं, किंवा आपल्याला कुणी जिंकलं नाहीं. तेव्हां अशा प्रसंगी योग्य काय हें मला सांगतां येत नाहीं."

मेयर ऑर्डननं आपलं बोट पुनः दुसऱ्या कानांत घातलं होतं. तो म्हणाला. "मला वाटतं आपण कांहींच देऊं नये. मला वाटतं लोकांना तें आवडणार नाहीं. कां कुणास ठाऊक, पण त्यांच्या बरोबर बसून दारू प्यावी, असं मला नाहीं वाटत."

तिनं शेवटीं डॉक्टरला विचारलं "पूर्वीच्या काळीं नसत का लोक, म्हणजे पुढारी, एकमेकाला शाबासकी देत-दारू पीत?"

डॉक्टरनं मान हलवून म्हटलं " हं खरं आहे. " पण तो पुढं म्हणाला. " पण त्यावेळची परिस्थितीच निराळी होती. इंग्लिशमन शिकार खेळतो त्याप्रमाणं, राजे व राजपुत्र लढाईचा खेळ खेळत असत. शिकारींत कोल्हा मारला कीं, खान्याला शिकारी एकत्र जमतात त्याप्रमाणंच ते लढाई खेळणारे जमत. पण, मेयर ऑर्डन म्हणतो. ते बरोबर आहे, आपल्या मेयरनं शत्रूबरोबर दारू पिणं, लोकांना खपणार नाहीं. "

मेयरची बायको म्हणाली, " ॲनी सांगत होती कीं, लोक चौकांत बॅंड वाजतोय् तो ऐकताहेत. हें जर ते करूं शकतात तर, आपण सुधारलेल्या चालीरिती कां पाळूं नये ? "

मेयरनं तिच्याकडे क्षणभर पाहिलं. त्याच्या आवाजांत तिखटपणा आला होता. " आपली परवानगी असेल तर आपण त्यांना दारुविरू कांहीं देणार नाहीं. सध्यां लोक गोंधळले आहेत. आज इतके वर्षे ते शांततेनं रहात आले आहेत, कीं जवळ जवळ त्यांचा लढाईवरचा विश्वास उडाला आहे. पण लोकांना समजेल नि मग त्यांच्या मनांतील गोंधळ दूर होईल. गोंधळ होऊं नये म्हणून त्यांनी माझी निवड केली. आज सकाळीं शहरांतल्या सहा तरूण सैनिकांचा खून करण्यांत आला. मला वाटतं आपण शिकारीनंतरचा खाना करूं नये. जनता षोकासाठीं लढत नाहीं. "

त्याच्या बायकोनं किंचितशी मान लवविली. आजपर्यंत तिच्या आयुष्यांत असे अनेक प्रसंग येऊन गेले होते कीं, जेव्हां तिच्या नवऱ्याचं " मेयर " मध्यें रुपांतर झालं होतं. नवरा आणि मेयर यांची गल्लत करायची नाहीं, हें तिला कळलं होतं.

मेयरनं घड्याळांत पाहिलं. जोसेफ जेव्हां कॉफी घेऊन आला तेव्हां त्याचं मन दुसराच कसला तरी विचार करीत होतं. " थॅंक यू " म्हणून शिष्टाप्रमाणं तो कॉफीचे घुटके घेऊं लागला. तो डॉक्टर विंटरला म्हणाला, " मी स्पष्ट बोललं पाहिजे...शत्रूपाशीं किती शिपाई आहेत, तुला वाटतं ? "

" फार नाहीं " डॉक्टरनं उत्तर दिलं. " मला वाटतं अडीचशेंवर नसतील, पण प्रत्येकाजवळ त्या छोट्या मशिनगन्स आहेत "

मेयरनं कॉफीचा घुटका घेऊन नवीन प्रश्न विचारला- " बरं पण, देशाच्या इतर भागांची काय हकीकत आहे ? ".

डॉक्टरनं खांदे उंचावून पुनः खालीं केलं.

" कुठंच प्रतिकार झाला नाहीं ! " मेयरनं निराश होऊन विचारलं.

डॉक्टरनं पुनः खांदे उंचावले. " मला माहीत नाहीं. तारा तोडण्यांत आल्या आहेत, किंवा शत्रूच्या ताब्यांत गेल्या आहेत, कांहींच बातमी नाहीं. "

" बरं, आपले शिपाई ? "

" ठाऊक नाहीं, " डॉक्टर म्हणाला.

इतक्यांत जोसेफ मध्येंच म्हणतो- " मी असं ऐकलं -म्हणजे -ॲनीनं ऐकलं — "

" काय ? जोसेफ, काय ऐकलं ? "

" मशीनगन्सनीं सहाजण ठार झाले. ॲनीनं ऐकलं, कीं तिघे जखमी होऊन पकडले गेले. "

" पण एकंदर बारा होतं. "

" ॲनीनं असं ऐकलं कीं, तिघे निसटले. "

मेयरनं एकदम विचारलं " कोणकोण निसटले ? "

" मला नाहीं ठाऊक. ॲनीनं तें ऐकलं नाहीं. "

मेयरच्या बायकोनं टेबलावर हात फिरवून धूळ सांचलीय् कीं काय, तें पाहिलं. ती म्हणाली, " जोसेफ, ते आले कीं घंटीच्याजवळ उभा रहा. आम्हांला कांहीतरी लागेल. आणि हें बघ, हा कोट बदल पाहूं -तो बटणांचा कोट घाल. " जरा वेळ थांबून ती पुन्हां म्हणाली- आणि जोसेफ, सांगि-लेलं काम करून झालं, कीं खोलीच्या बाहेर जा. आजूबाजूला उभं राहून गोष्टी ऐकणं यानीं वाईट मत होतं. असं चोरून बोलणीं ऐकणं गांवढळपणा आहे. "

" होय, मादाम. "

" जोसेफ, आपण दारू देत नाहीं पण, त्या चांदीच्या पेटींत सिगरेट्स् भरून ठेव. आणि कर्नलची सिगरेट पेटवितांना, बुटावर काडी ओढूं नको.

काड्याची पेटी वापर." "होय मादाम." मेयर ऑर्डननं कोटाचीं बटणं सोडून, घड्याळ बाहेर काढलं; किती वाजले तें पाहून घड्याळ पुनः आंत ठेवलं व कोटाची बटणं लावलीं. पण चुकून खालचं बटण वरती लागलं. मादामनं पुनः बटणं लावून कोट सारखा केला.

डॉक्टरनं विचारलं "वाजले किती ?"

"अकराला पांच मिनिटं आहेत."

"वक्तशीर लोक." डॉक्टर म्हणाला, "ते अगदीं वेळेवर येतील! मी बाहेर जावं, असं वाटतं कां तुला ?"

मेयर ऑर्डन दचकला. "जातोस ? छेः! जाऊं नको. इथंच थांब." तो मंदहास्य करून म्हणाला. "मला थोडी भीति वाटते—भीती नाहीं-पण नर्व्हस झाल्यासारखं वाटतं–" शेवटीं तो निराशेनं म्हणाला, "बऱ्याच वर्षांत आपण जिंकलों गेलों नाहीं," – तो चाहूल घेण्यासाठीं थांबला. दूरवर, बँडवर कवाईतीचं गाणं वाजत होतें. सर्वांचे कान तिकडे लागले.

मादाम म्हणाली "हे पहा आले ते. एकदम पुष्कळसे आज गर्दी न करतील तर बरं होईल. ही खोली कांहीं फार मोठी नाहीं."

डॉक्टर विंटर औपरोधिकपणं म्हणाला, "मादामला व्हेर्सायचा आरसेमहाल पसंत पडला असता." तिनं किंचित ओठ चावले व सभोंवार नजर फिरवली. मनांतल्यामनांत ती शत्रूला खोलींत बसवित होती. "फारच लहान आहे ही खोली."

बँडचा आवाज थोडा चढला व पुनः मंदावला. दारावर हळूच टिचकी वाजली.

"कोण बरं आलं असेल ? जोसेफ, कुणी असेल त्याला म्हणावं मागाहून ये. आम्ही फार कामांत आहों."

दारावर पुनः टिचकी वाजली. जोसेफ दाराजवळ गेला. प्रथम त्यानं दाराची फट उघडली नंतर दार उघडलं. पोलादी टोपी, हातावर करस्त्राण घातलेली अशी राखी रंगाची आकृति दिसली. "कर्नल लॅन्सरना आपल्याला भेटायची इच्छा आहे."

जोसेफनं दार उघडलं. तो शिपाई आंत आला. आसपास नजर फिरवून तो बाजूला उभा राहिला " कर्नल लॅन्सर. "

कर्नल लॅन्सरच्या डोक्यावर पोलादी टोपी होती. फक्त खांद्यावर, त्याचा लष्करी हुद्दा दर्शविणाऱ्या फिती लावल्या होत्या. त्याच्या मागोमाग एक ठेंगणासा इसम आंत शिरला. याच्या आंगात काळा सूट होता. कर्नल मध्यम वयाचा होता. तो बराच थकलेला पण कणखर व करारी दिसला. त्याचे खांदे एकाद्या शिपाई गड्याप्रमाणं रुंद होते, पण सामान्य शिपायाप्रमाणं त्याची दृष्टि मात्र शून्य दिसत नव्हती. त्याच्या मागोमाग आलेला ठेंगणा इसम, डोक्याला टक्कल पडलेला होता. त्याचे गाल गुलाबी असून, ओंठ कामुक दिसत होतें.

कर्नल लॅन्सरनं आंत आल्यावर शिरस्त्राण काढलं व मेयरला " युवर एक्सलन्सी ! " म्हणून चटकन् अभिवादन केलं. " मादाम ! " म्हणून तो मादामकडे पाहून किंचित लवला. शेवटीं तो म्हणाला, " कॉर्पोरल, दार बंद कर पाहूं. " इतक्यांत चटकन् पुढं होऊन जोसेफनं दार लावलं व कॉर्पोरल-कडे विजयी मुद्रेनं पाहूं लागला.

कर्नल लॅन्सरनं, डॉक्टर विंटरकडे प्रश्नार्थक दृष्टिनं पाहिलं. मेयर ऑर्डन म्हणाला, " डॉक्टर विंटर. "

" अंमलदार आहेत ? "

" डॉक्टर व स्थानिक इतिहासाची माहिती असलेले. "

लॅन्सर त्याच्याकडे वळून थोडा लवला, व म्हणाला, " डॉक्टर मी फाजिलपणानं बोलत नाहीं. पण लवकरच तुमच्या इतिहासांत नवं पान लिहिलं जाईल, कदाचित्— "

डॉक्टर विंटर हंसून म्हणाला, "कदाचित् अनेक पानं लिहिलीं जातील."

कर्नल आपल्या साथीदाराकडे वळून म्हणाला, " मि. कोरेलना आपण ओळखत असालच. "

मेयर म्हणाला, " जॉर्ज कोरेल ! अर्थात्. काय जॉर्ज, कसं काय चाललंय् ? "

डॉक्टर विंटर तीक्ष्णपणं पण सहजगत्या उद्‌गारला, " कर्नल साहेब, आमचा मित्र मि. जॉर्ज कोरेल यानं आपल्या स्वारीसाठीं या शहराची तयारी केली. आमचा उपकारकर्ता जॉर्ज कोरेल यानं आमचे शिपाई टेंकडीवर पाठवून दिले. आमचा पाहुणा जॉर्ज कोरेल यानं शहरांतील प्रत्येक हत्याराची यादी केली. आमचा मित्र जॉर्ज कोरेल ! "

कोरेल रागांत म्हणाला " माझा ज्यावर विश्वास आहे तें मी करतो. असं करणं अभिमानास्पद आहे. " ऑर्डनचे ओंठ आपोआप उघडले गेले. तो गोंधळला असून विंटर व कोरेल यांच्या तोंडाकडे आळीपाळीनं पहात होता. " जॉर्ज, खोटं आहे हें ! माझ्या घरीं माझ्याबरोबर बसून तूं दारू घेतली आहेस. हॉस्पिटल बांधण्याच्या कामीं मला तूं मदत केलीस ! खोटं आहे हें ! "

मेयर कोरेलकडे रोखून पहात होता. कोरेल मेयरकडे पहात असतांना शत्रूसारखा पहात होता. बराच वेळ कुणी कांहीं बोललें नाहीं नंतर मेयरचा चेहरा करारी दिसूं लागला, त्याचे सर्वांग ताठरलं. तो लॅन्सरला म्हणाला, " या सद्‌गृहस्थांच्या समोर मला कांहींएक बोलण्याची इच्छा नाहीं. "

कर्नल लॅन्सर कोरेलला म्हणाला, " मि. कोरेल बाहेर जाल कां आपण ? "

कोरेल म्हणाला, " मला इथं रहाण्याचा हक्क आहे ! "

कर्नलनं दटावलं, " मि. कोरेल बाहेर जाल का आपण ? माझा अपमान करतोस ? "

" नाहीं महाराज. "

" मि. कोरेल कृपा करून बाहेर जा पाहूं. "

कोरेलनं मेयरकडे रागारागानं पाहिलं व वळून लगेच बाहेर गेला. डॉक्टर विंटर गालांतल्या गालांत हांसत म्हटला– " यावर माझ्या इतिहासांत एक पॅराग्राफ लिहितां येईल. " कर्नल लॅन्सरनं त्याच्याकडे चमकून पाहिलं, पण तो कांहीएक बोलला नाहीं.

इतक्यांत उजव्या बाजूचं दार उघडलं गेलं, ॲनीचा रागावलेला चेहरा दारांत दिसला. तिचे केंस गवतासारखे दिसत व डोळे लाल होते. " मादाम, मागच्या बाजूला शिपाई येऊन उभे राहिले आहेत. "

" तें आंत शिरणार नाहींत, " कर्नल लॅन्सर म्हणाला " तो लष्करी शिरस्ता आहे. " मादाम चिडखोरपणानं म्हणाली, " ॲनी तुला कांहीं सांगायचं असलं तर जोसेफला सांग, तो निरोप घेऊन येईल. "

" त्यांना कॉफीचा वास गेलाय्. ते आंत येतील " ॲनी म्हणाली.

" ॲनी ! "

" मादाम, " म्हणून ती मागं सरली.

" मी बसूं कां ? " कर्नल स्पष्टीकरणार्थ म्हणाला. " आम्हांला झोपच मिळाली नाहीं अलीकडे. " मेयर स्वतःच झोपेतून जागा झाल्यासारखा होऊन म्हणाला " हो खुशाल बसा ! "

कर्नलनं मादामकडे पाहीलं — ती खुर्चीत बसली असं पाहून तो थकल्यागत बसला. मेयर ऑर्डन उभ्याउभ्या अर्धवट स्वप्नांत होता.

कर्नलनं बोलायला सुरवात केली. " आम्हांला शक्य तितकं सुरळीत काम चालवायचं आहे. मेयरसाहेब हा व्यवहाराचा सीधा सवाल आहे. आम्हांला इथली मासळी नि कोळशाची खाण हवी आहे. हें काम चालूं असतांना खटके उडण्याचे प्रसंग टाळायची आम्हीं कोशीस करूं. "

मेयर म्हणाला " मला कांहीं बातमी नाहीं. देशाच्या इतर भागांत काय झालं ? "

" सर्व देश जिंकला गेला " कर्नलनं सांगितलं " आमची तयारी कडेकोट होती. "

" कुठंच प्रतिकार झाला नाहीं ? " मेयरनं प्रश्न केला.

मेयरकडे अनुकंपेनं पहात कर्नल म्हणाला " मला वाटतं प्रतिकार झाला नसता तर बरं झालं असतं. थोडासा प्रतिकार झाला पण त्यामुळं रक्तपात ओढवला. आम्हीं फार काळजीपूर्वक योजना आंखली होती. "

ऑर्डननं आपला मुद्दा सोडला नाहीं. " पण प्रतिकार झाला ? "

" होय, पण प्रतिकार करणं मूर्खपणाचं होतं. इथल्या प्रमाणंच प्रतिकार ताबडतोब नष्ट करण्यांत आला. प्रतिकार करणं घातुक व वेडेपणाचं होतं. "

पण मेयरचं औत्सुक्य डॉक्टरनं जाणलं. तो म्हणाला. " असेल ! प्रतिकार करणं वेडेपणाचं असेल पण त्यांनी प्रतिकार केला ? "

कर्नलनं उत्तर दिलं. " फार थोड्यांनी प्रतिकार केला व ते ठार झाले. एकंदरीत लोक शांत आहेत. "

डॉक्टर विंटर म्हणाला. " काय झालंय्, हेंच लोकांना अजून कळलं नाहीं. "

" त्यांना कळायला लागलंय् " कर्नल म्हणाला. " पुनः ते असा वेडेपणा करणार नाहींत. " त्यानं घसा साफ करून बोलायला सुरुवात केली. त्याच्या आवाजांत करडेपणा आला होता. " आतां मला कामाला लागलं पाहिजे. खरं म्हणजे, मी फार थकलोंय, पण निजण्यापूर्वी मला माझी व्यवस्था केली पाहिजे. " तो खुर्चीत पुढं सरकत म्हणाला, " मी शिपायापेक्षां इंजिनिअरच आहे. देश जिकणं हें इंजिनिअरिंगचंच काम आहे. खाणींतून कोळसा काढून बाहेर पाठविला पाहिजे. आमच्यापाशीं तज्ञ आहेत पण इथल्या लोकांनी खाणींत काम चालू ठेवलं पाहिजे. समजलं ? कठोर रितीनं वागण्याची आमची इच्छा नाहीं. "

ऑर्डन म्हणाला " तें स्पष्टच दिसतंय् पण समजा, लोकांना खाणींत काम करायचं नसेल तर ? "

कर्नल म्हणाला " मला वाटतं त्यांची इच्छा असेल, कारण त्यांना काम केलंच पाहिजे. आम्हांला कोळसा मिळालाच पाहिजे. "

" पण त्यांनी काम केलं नाहीं तर ? "

" केलंच पाहिजे, ते शिस्तशील ( शांततेनं वागणारे ) लोक आहेत. त्यांना गडबड नको आहे. " मेयर काय म्हणतो ते ऐकण्यासाठीं, कर्नल थांबला व शेवटीं त्यानं विचारलं, " असं नाहीं का ? "

मेयरनं हातानं हनुवटी दुमडली. " मी काय सांगूं ! स्वराज्यांत ते शांततेनं वागणारे लोक आहेत. पण तुमच्या राजवटींत ते कसे वागतील तें मला सांगतां येत नाहीं. आमचं सरकार आज चारशें वर्षांचं जुनं आहे. "

कर्नल लगेच म्हणाला, " तें आम्हांला ठाऊक आहे, म्हणूनच आम्हीं तुमचं सरकार कायम ठेवणार आहोंत. तुम्हीं स्वतःच मेयर म्हणून राहाल, हुकूम द्याल, शिक्षा कराल व बक्षिसं द्याल. याप्रमाणं झालं, तर लोक त्रास देणार नाहींत "

मेयरनं डॉक्टर विंटरला विचारलं " कसला विचार चाललाय तुझा ? "

" कांही सांगतां येत नाहीं मला, " तो म्हणाला, " काय घडेल तें मोठं आश्चर्यकारक ठरेल यांत शका नाहीं. गडबड होईल अशी माझी अपेक्षा आहे. लोक कडवे असतील. "

मेयर ऑर्डेन म्हणाला. " मला पण कांही सांगतां येत नाहीं. " तो कर्नलकडे वळून म्हणतो, " मी याच लोकांतील एक, तरीसुद्धां ते काय करतील, तें मला सांगतां येत नाहीं. कदाचित् तुम्हांला किंवा आम्हांला वाटतं त्यापेक्षां तें भिन्नही असूं शकेल. कांही लोक नेमलेले पुढारी मानतात व त्यांचं ऐकतात. पण माझ्या लोकांनीं मला निवडलं आहे. त्यांनीं मला निर्माण केलं व ते माझा नाशही करूं शकतील. मी तुम्हांला सामिल झालों, असं जर त्यांना वाटलं, तर ते माझा नाशही करतील, कांही सांगतां येत नाहीं. "

कर्नल म्हणाला " तुम्ही जर सुव्यवस्था राखलीत, तर त्याना मदत केल्यासारखं होईल. "

" काय मदत ? "

" होय मदत त्यांचं हानिपासून दुःखापासून संरक्षण करणं, हें तुमचं कर्तव्य आहे. लोक बंडखोर होणं धोक्याचं आहे. असं पहा कीं, आम्हांला कोळसा मिळालाच पाहिजे. कोळसा मिळवा म्हणून आमचे पुढारी आम्हांला हुकूम सोडतात; पण तो कसा—मिळवा हें कांही सांगत नाहींत. पण तुम्हांला तुमच्या लोकांचं संरक्षण करायचं आहे. लोकांना काम करायला लावून त्यांना तुम्ही सुरक्षित ठेवलं पाहिजे. "

मेयरनं विचारलं; " पण त्याना सुरक्षित रहायचं नसलं तर ? "

" मग तुम्हीं त्यांच्यासाठीं विचार केला पाहिजे. "

ऑर्डेन किंचित् अभिमानानं म्हणाला, "आपल्यासाठीं दुसऱ्यांनीं विचार करावा, हें माझ्या लोकांना आवडत नाहीं कदाचित तुमच्या लोकांपेक्षां ते भिन्न असतील. मी गोंधळलों असलों तरी त्याची मला खात्री आहे."

इतक्यांत जोसेफ घाईघाईनं आंत येऊन उभा राहिला; बोलण्यासाठीं तो उतावीळ झाला होता.

"माफ करा मादाम !" जोसेफ बोलूं लागला "माफ करा कर्नेल साहेब."

"काय पाहिजे ?" मेयरनं विचारलं.

"ॲनी- ॲनी संतापलीय, साहेब"

"काय झालं ?" मादामनं विचारलं.

"मागं शिपाई आले आहेत तें तिला खपत नाहीं."

कर्नेलनं विचारलं. "काय, गडबड करताहेत कां ते ?"

"ते दारांतून ॲनीकडे पाहताहेत-तिला त्याची चीड आहे."

कर्नेल म्हणाला. "ते हुकूम पाळीत आहेत, कुणाला त्रास देत नाहींत."

"पण ॲनीला आपल्याकडे कुणी टक लावून पाहिलं कीं चीड येते."

मादाम म्हणाली. "जोसेफ, ॲनीला म्हणावं सांभाळ काळजी घे तूं"

"बरं मादाम." म्हणून जोसेफ बाहेर गेला.

कर्नेलच्या डोळयांवर श्रमानं झांपड आली होती. "आणखी एक गोष्ट आहे, युवर एक्सलन्सी, माझी व माझ्या स्टाफची इथं राहण्याची सोय होईल का !"

मेयर ऑर्डेन क्षणभर विचार करून म्हणाला. "ही जागा फार लहान आहे. इतर ठिकाणीं, प्रशस्त व सोईस्कर जागा आहेत."

नंतर जोसेफ चांदीची सिगरेट बॉक्स घेऊन आला. त्यानं पेटी उघडून कर्नेलपुढं धरली. कर्नेलनें सिगरेट घेतल्यावर, जोसेफनं डौलानं ती पेटवली, कर्नेल जोरानं झुरके मारूं लागला. "जागा नाहींत असं नाहीं." "कर्नेल म्हणाला "पण त्याचं असं आहे, कीं स्टाफ स्थानिक अधिकाऱ्याच्या घरांत रहात असला, कीं अधिक शांतता असते."

" म्हणजे तुम्हांला असं म्हणायचंय्, कीं लोकांनां वाटतं, स्थानिक अधिकारी तुम्हांला सामिल आहे ! ".

" हं, माझा समज तसाच आहे. "

मेयर ऑर्डननं निराशेनं डॉक्टर विंटरकडे पाहिलं त्यानं मेयरकडे पाहून केवळ कटु हास्य केलं. ऑर्डननं हलक्या सुरांत विचारलं " हा मान न स्वीकारण्याची मला परवानगी आहे का ? " कर्नलनं उत्तर दिलं " माफ करा नाहीं, माझ्या पुढाऱ्याचा हुकूम आहे. "

" लोकांना तें आवडणार नाहीं " मेयर म्हणाला

" एकसारखे लोक ! लोक निःशस्त्र आहेत. लोकांना यांत बोलण्याचा अधिकार नाहीं."

मेयरनं डोकं हलविलं "महाराज आपल्याला समजत नाहीं."

दाराच्या बाजूनं रागावलेल्या बाईचं बोलणं ऐकूं आलं नंतर कांहीं तरी पडल्याचा व शेवटीं माणसाची किंकाळी कानीं आली. जोसेफ धडपडत आला. "तिनं उकळतं पाणी फेंकलं, ती फार संतापलीय्."

दारांतून हुकूम सोडल्याचा आवाज आला, लगेच पाय वाजले. कर्नल, लॅन्सर गडबडून उठला. "आपल्या घरांतील नोकरांचाकरावर आपला वचक नाहीं काय ? " त्यानं संतापून विचारलं.

मेयर ऑर्डन हंसून म्हणाला. "फारच थोडा आहे." तो पुढं म्हणाला. "ती आनंदात असली म्हणजे सुग्रण स्वयंपाकीण आहे. बरं कुणाला दुखापत झाली का ?" त्यानं जोसेफला प्रश्न केला.

" आधणाचं पाणी होतं साहेब. "

कर्नल लॅन्सर म्हणाला. "आम्हांला फक्त आमचं काम पार पाडायचं आहे. तें इंजिनिअरिंगचं काम आहे. तुम्हांला स्वयंपाकीणीला शिस्त लावावी लागेल. "

"शक्य नाहीं तें मला. ती नोकरी सोडून जाईल."

"ही आणीबाणीची वेळ आहे. तिला नोकरी सोडतां येत नाहीं."

"मग ती आधण फेंकील." डॉक्टर विंटर म्हणाला.

"दार उघडलं गेलं, दारांत एक शिपाई उभा होता त्यानं विचारलं. "मी या बाईला अटक करू का ?"

"कुणाला दुखापत झाली काय ?" कर्नलनं विचारलं.

"होय. एक होरपळला व एकाला ही बाई चावली. आम्ही तिला पकडून ठेवली आहे."

लॅन्सर निराश झालेला दिसला. तो म्हणाला, "सोडून द्या तिला. आणि पोर्चपासून बाहेर लांब जा."

"बरं आहे." म्हणून तो निघून गेला. दार बंद झालं.

लॅन्सर म्हणाला. "मी तिला गोळी घालून ठार मारली असती; कोंडून ठेवली असती."

"मग आम्हांला स्वयंपाकीण राहिली नसती." ऑर्डन म्हणाला.

"हें पहा तुमच्या लोकांकडून काम करून घ्यायचं, अशी मला आज्ञा आहे."

"माफ करा," मादाम म्हणाली. "शिपायांनी ॲनीला कांही दुखापत केलीय् का तें पाहून येतें." असं म्हणून ती निघून गेली.

लॅन्सर आतां उठून उभा राहिला. "मी मघां म्हटलं कीं, मी फार थकलोंय् मला थोडी तरी झोंप मिळालीच पाहिजे. आपणा सर्वांच्या सुखासाठीं, कृपा करून माझ्याशीं सहकार्य करा" मेयर बोलत नाहीं असं पाहून लॅन्सरनं पुनः विचारलं. "सर्वांसाठीं एवढं कराल काय ?"

ऑर्डन म्हणाला. "हें लहान शहर आहे. मला कांहीं सांगतां येत नाहीं. लोक गोंधळलेत नि मी पण गोंधळांतच आहे."

"पण सहकार्य करण्याचा आपण प्रयत्न कराल का ?"

मेयरनें मान हलविली. "सांगतां येत नाहीं. जेव्हा शहर एकादी गोष्ट करण्याचं ठरवील, तेव्हां मी बहुतेक ती करीन."

"पण तुम्हीं अधिकारी आहांत."

ऑर्डन हंसला. "तुम्हांला कदाचित् हें पटणार नाहीं, अधिकारी शहराच्या हातीं आहे. तो, कां व कसा हें मला ठाऊक नाहीं, पण हें खरं

आहे. याचा अर्थ असा कीं, आम्हीं तुमच्या इतके चपळाईनं काम करणार नाहीं, पण एकदां दिशा ठरली, कीं आम्हीं सगळे बरोबर काम करूं. मी गोंधळलों आहे, मला कांहीं सांगतां येत नाहीं."

लॅन्सर कंटाळून म्हणाला. "मला वाटतं, आपण जुळवून घेऊं व काम करूं, जर मिळून मिसळून काम केलं, तर प्रत्येकाला सोपं पडेल. आम्हीं तुमच्यावर विश्वास ठेवूं शकूं अशी मला आशा आहे. सुव्यवस्था राखण्यासाठीं लष्कर जें करील, त्याचा विचारसुद्धां माझ्यानं करवत नाहीं."

मेयर ऑर्डन स्तब्ध होता.

"आम्हीं तुमच्यावर विश्वास ठेवूं शकूं, अशी मला आशा आहे."

ऑर्डननं कानांत बोट घालून हलविलं. "मला सांगतां येत नाहीं." तो म्हणाला.

इतक्यांत मादाम आली. "अॅनी चवताळली आहे. ती शेजारच्या ख्रिस्टिनशीं बोलत आहे. ख्रिस्टिन सुद्धां संतापली आहे."

"ख्रिस्टिन अॅनीपेक्षां चांगली स्वयंपाकीण आहे." मेयर म्हणाला.



# प्रकरण २ रें.

मेयरच्या छोट्या राजवाड्याच्या वरच्या मजल्याची कर्नल लॅन्सरच्या स्टाफनं आपली मुख्य कचेरी केली. स्टाफ म्हणजे, कर्नल लॅन्सर शिवाय इतर पांचजण. त्यापैकीं एक मेजर हंटर. हा दिसायला लहानसा असून नेहमीं भेदरलेला असायचा. याला आंकडेमोडीचा जबरा नाद. स्वतः इमानी शिपाई असल्यामुळं, इतरांना तो एक तर इमानी शिपाई, किंवा जगायला नालायक ठरवायचा. मेजर हंटर हा इंजिनिअर होता, आणि जर लढाई सुरू झाली नसती, तर याला सैन्यांत अधिकारी नेमण्याचा विचार कुणाच्याही मनाला शिवला नसता. कारण मेजर हंटर शिपायांना रकमांतील आंकड्या प्रमाणं समजे, त्यांना रांगेत मांडी, त्यांची बेरीज वजाबाकी व गुणाकार करी. तो गणितशास्त्रज्ञ नव्हे तर निव्वळ आंकडेमोड्या होता. उच्चगणितशास्त्रांतील, विनोद, संगीत वा गूढवाद त्याच्या डोक्यांत उतरत नसे. सहा ज्याप्रमाणं आठापासून भिन्न, त्याप्रमाणं माणसांतसुद्धां उंचीचा, रंगाचा व वजनाचा फरक पडेल. पण या व्यतिरिक्त त्यांच्यात फारसा फरक नाहीं, असं त्याला वाटे. आतांपर्यंत त्यानं अनेक लग्नं केलीं होतीं, पण त्याला सोडतांना, बायका " नर्व्हस " कां व्हायच्या, हें त्याला उमगलं नाहीं.

कॅप्टन बेंटिक हा कौटुंबिकवृत्तीचा होता. त्याला कुत्रे, गोरीगोमटीं मुलं व ख्रिस्तमस, यांची फार आवड. वास्तविक त्याचं वय लक्षांत घेतां त्याला कॅप्टनपेक्षां वरचा हुद्दा मिळायला हवा होता, पण त्याच्या आंगी असलेला महत्वाकांक्षेचा विचित्र अभाव यामुळं तो अजून कॅप्टनच राहिला होता. तो इंग्लिशजंटलमनचा मोठा चाहता होता. तो इंग्लिश पोशाख करी,

इंग्लिश कुत्रे पाळी, मुद्दाम लंडनहून मागविलेला तंबाकू, इंग्लिश पाईपमध्यें भरून ओढी, बागकामाची प्रशंसा करणाऱ्या व इंग्लिश कुत्रे चांगले कीं गॉर्डन कुत्रे चांगले यांचा खल करणाऱ्या इंग्लिश मासिकांचाही तो वर्गणीदार झाला होता. कॅप्टन बेंटिक सुटीचे दिवस ससेक्समध्यें घालवी. आपल्याला ब्यूडापेस्ट किंवा पारिस या ठिकाणीं इंग्लिशमन समजलं जावं, अशी त्याची इच्छा होती. युद्धामुळं सारीच उलटापालट झाली होती. पण तो आज इतकीं वर्षे पाईप ओढीत होता व हातांत काठी घेऊन फिरत होता कीं, एकदम हें सोडणं कठीण होतं. पांच वर्षांपूर्वी, मिडलंडस्मधील गवत नाहींसं होत चाललं आहे यासंबंधी त्यानं "टाईम्सला" एक पत्र पाठविलं होतं व खालीं एडमंड ट्रिवेल Esq. अशी सही केली होती व " टाईम्सनं " तें छापलं सुद्धां होतं.

कॅप्टन बेंटिक आज बरेच वर्षं कॅप्टन राहिला होता, तर कॅप्टन लॉफ्ट फारच तरूणपणीं कॅप्टन झाला होता. कॅप्टन लॉफ्ट मूर्तिमंत कॅप्टन होता. कॅप्टनचं रक्त त्याच्या नसानसांतून खेळत होतं. त्याच्या शरीराच्या लहान सहान हालचालीं देखील लष्करी असत. तुफानी महत्वाकांक्षेच्या जोरावर तो कॅप्टनच्या हुद्दयावर चढला होता. दुधावर साय यावी त्याप्रमाणं तो चढत गेला. एकाद्या निपुण नर्तकीप्रमाणं तो बुटाच्या खोटा " टक्कन " वाजवी. लष्करी सलामीचा प्रत्येक प्रकार त्याला ठाऊक असून, ते सर्व अत्यंत कसोशीनं उपयोगांत आणण्यासंबंधी त्याचा कटाक्ष असे. जनरल्स सुद्धां त्याला वचकून असत, कारण शिपायानं कसं वागावं, याची त्याला त्यांच्यापेक्षां अधिक माहिती होती. प्राणीजीवनाची अत्युच्च प्रगति म्हणजे शिपाई असं त्याचं मत होतं. कधीं जर त्याला परमेश्वराची आठवण येतच असेल तर ती अशी कीं, परमेश्वर हा एक वयोवृद्ध सन्मान्य सेवानिवृत्त जनरल असून त्याचे केंस पिकलेले आहेत; तो केवळ जुन्या लढायांच्या स्मृतींत जगत आहे व वर्षांतून कित्येकदां आपल्या लेफ्टनंट्स्च्या थडग्यांवर पुष्पहार वाहात आहे. कॅप्टन लॉफ्टला असंही वाटे कीं सर्व स्त्रिया युनिफॉर्म घातलेल्या माणसांवर प्रेम करतात व त्याला वाटे, " प्रेमांत पडल्याशिवाय त्या कशा रहातील ! " नेहमींच्या परिस्थितींत पंचेचाळीसाव्या वर्षी तो ब्रिगेडियर जनरल

झाला असता, लेसवाल्या हॅटस् घातलेल्या उंच फिक्ट, पुरुषी स्त्रिया बाजूला आहेत, अशा थाटांत, त्याचा फोटोदेखील सचित्र वर्तमानपत्रांतून झळकला असता.

लेफ्टनंट प्रॅकल व टॅाडर हे दोघेही लांब नाकाचे होते. अत्यंत प्रतिभाशाली पुरुषानं शोधून काढलेल्या नव्या व्यवस्थेवर त्यांचा दांडगा विश्वास होता. शोधकाऱ्या प्रतिभेनं तर ते इतके भारून गेले होते, कीं त्या व्यवस्थेचे परिणाम काय होत आहेत याच्याकडे त्यांनीं ढुंकूनसुद्धां पाहिलं नाहीं. ते भावनावश तरुण असून, अश्रू व क्रोध त्यांना हलवून सोडीत. लेफ्टनंट प्रॅकल आपल्या घड्याळांत, निळ्या सॅटिनच्या कापडांत गुंडाळलेला एक केंस घालून ठेवीत असे. पण तो केंस लागला आंतल्या चाकांत अडकायला, तेव्हांपासून प्रॅकल रिस्टवॉच वापरूं लागला. प्रॅकल रंगेल तरुण असून त्याला नाचाची आवड होती. तरी तो आपल्या पुढाऱ्यासारखे ( हिटलरसारखे ) डोळे वटारी, भुंवया चढवी, कपाळाला आंठ्या घाली व विचारांत गढून जाई. तो भ्रष्ट कलेचा द्वेष्टा असून, स्वतःच्या हातानं त्यानं अनेक चित्रं टरकावलीं होती. नाचाच्या वेळीं त्यानं आपल्या दोस्ताची चित्रं इतकीं चांगली काढलीं होतीं, कीं "तूं कलावंत व्हायला पाहिजे होतास" असं ते नेहमीं म्हणत. त्याच्या बहिणी सुंदर होत्या. त्यांची त्याला इतकीं घमेंड कीं कुणी त्यांची टवाळी केली, असं त्याला वाटलं म्हणून त्यानं एकदां गडबडही उडविली होती त्याच्या बहिणीनां भीति वाटायची, कारण काय टवाळी केली म्हणून जर कुणी विचारलं तर त्या काय सांगणार ! लेफ्टनंट टॅाडरची बहीण सुंदर व रंगेल होती. प्रॅकल ड्यूटीवर नसला कीं तिला कशी बिघडवावी याचाच तास् न् तास विचार करी. पण टॅाडरच्या बहिणीला वाटे कीं, आपल्याला एकाद्या म्हाताऱ्यानं इसमानं बिघडवावं, निदान तो प्रॅकलप्रमाणं आपले केंस तरी विस्कटणार नाहीं.

लेफ्टनंट टॅाडर हा कवि होता. उदात्त विचाराचा तरुण व दुर्दैवी नायिका, यांच्या आदर्श प्रेमाची स्वप्नं तो रंगवी. तो कडवा दुःखवादी होता. त्याच्यांत कटु अदभुतरम्यता असून, त्याची दृष्टि त्याच्या अनुभवाइतकीच विस्तीर्ण होती. तो कल्पनात्मक श्यामल स्त्रियांना उद्देशून ओठांतल्या ओठांत

निर्यमक काव्यपंक्ति पुटपुटत असे. त्याची मनापासून अशी दांडगी इच्छा कीं, आपल्याला रणांगणावर मरण यावं; मागं आपले आईवडील अश्रू ढाळीत असावे, आणि आपला पुढारी [ हिटलर ] धीरगंभीर पण खिन्न मुद्रेनें मृत्यु-शय्येवर पडलेल्या तरुणाकडे पहात असावा. आपल्या मृत्युची कल्पना वारंवार त्याच्या मनांत येई. नेहमी तो हें चित्र असं रंगवी कीं, सूर्यास्त होत आहे, त्याचे अखेरचे किरण, चक्काचूर झालेल्या लष्करी हत्यारांवर चमकत आहेत, आपले सैनिक सभोंवार निःशब्द उभे आहेत, त्यांनी माना खालीं घातल्या आहेत, एका प्रचंड मेघावरून पुरंध्री माता व नायिका दोघीही अभिन्न अशा स्थितींत, वाल्करी [ ओदिनच्या कुमारिकेप्रमाणं ] प्रमाणं प्रचंड मेघांवरून तरंगत जात आहेत, व वॅग्नरच्या मेघगर्जनामय संगीतानं पार्श्वभूमि कडाडत आहे एवढंच नाहीं, तर त्यानं अखेरचा संदेशसुद्धां आपल्या मनाशीं योजून तयार ठेवला होता.

ही माणसं म्हणजे कर्नल लॅन्सरच्या स्टाफ. लहान मुलांप्रमाणं हे " लढाईचा खेळ " खेळत होते. मेजर हंटरला युद्ध म्हणजे अंकगणितांतलं उदाहरणच वाटे. तें सुटलंरे सुटलं कीं घरीं जाऊन आरामशीर शेकत बसायचं; कॅप्टन लॉफ्टचं मत असं कीं पद्धतशीरपणं वाढविण्यांत आलेल्या तरुणाची युद्ध, म्हणजं आदर्श–" करीअरच " आहे; लेफ्टनंट प्रॅकल व टॉडर दोघेही, युद्ध मायेनं भरलेलं स्वप्नच समजत, आणि तसं म्हणजे आतांपर्यंत त्यांना युद्ध हा मजेशीर खेळच वाटत होता. कारण उत्कृष्ट शस्त्रास्त्रं, व उत्कृष्ट योजना यांच्या जोरावर, निःशस्त्र योजनाहीन शत्रूवर मात करणं हा मजेशीर खेळच नव्हेतर काय ? आतांपावेतों त्यांनी एकदांही हार खाल्ली नव्हती कीं त्यांच्या आंगावर लहानसा ओरखडासुद्धां उठला नव्हता. सर्वांसारखेच, परिस्थितीच्या दाबाखालीं, ते भेकड किंवा शूरही ठरले असते. लढाईत पुढं काय काय होतं, याचा त्यांच्यापैकीं एकट्या कर्नल लॅन्सरलाच अनुभव होता.

वीस वर्षांपूर्वी लॅन्सर बेल्जम व फ्रान्समध्यें होता. त्याला जें ठाऊक होतं तें तो विसरण्याचा प्रयत्न करी. युद्ध म्हणजे - त्याच्या माहितीप्रमाणं-फितुरी द्वेष, बेअक्कली जनरल्सचा सांवळागोंधळ, अत्याचार, हिंसा, रोग व

थकवा नि ग्लानी. हें सगळं संपलं कीं पुनः नवा थकवा नि नवा द्वेष. लॅन्सर स्वतःशी म्हणे, " मी आहे शिपाई. हुकूम दिलेले आहेत ते पाळायचे. बस्स. ! त्याच्यावर आणखी प्रश्न विचारणं किंवा विचार करणं, हें आपलं काम नव्हे. हुकूमाची तामिली करणं हेंच आपलं काम." गेल्या युद्धासंबधीच्या दुःखद स्मृती व हें युद्धही त्यांतलंच, ही खात्री, हे विचार तो मनांतून बाजूला सारण्याचा प्रयत्न करी. हें युद्ध कांहीं निराळंच होणार आहे, असं तो मनांतल्या मनांत दिवसांतून पन्नासदां तरी म्हणे.

कवाईत करतांना, जमावांत, फुटबॉलच्या खेळांत व युद्धांत, रूपरेषा अस्पष्ट होतात; खऱ्यागोष्टी कृत्रिम बनतात व मनांत गोंधळ माजतो. लढतांना मानसिक ताण, थकवा व हालचाली, एका प्रचंड स्वप्नांत एकरूप होतात, व दुसऱ्याला ठार मारतांना किंवा मारायचा हुकूम देतांना काय वाटतं, याची आठवण किती प्रयत्न केला तरी होत नाहीं. तेथें हजर असलेले लोक सांगतात कीं, " असं असं होतं, " व मग तुम्ही म्हणतां "हूं मला वाटतं तसंच असलं पाहिजे."

मेयरच्या राजवाड्याच्या मजल्यावरील तीन खोल्या या स्टाफनं आपल्या ताब्यांत घेतल्या होत्या. बेडरुममध्यें त्यानी कॉटस् व ब्लँकेटस् ठेवली असून, मेयरच्या तळमजल्यावरील दिवाणखान्याच्या बरोबर वरच्या खोलींत त्यांनीं क्लब थाटला होता. एथें एक टेबल व तीनचार खुर्च्या होत्या. एथंच बसून ते घरून आलेलीं पत्रं वाचीत व घरीं पत्रं लिहीत, एथंच ते गप्पा ठोकीत बसत, कॉफी मागवीत योजना आंखीत व विश्रांती घेत. खोलींतील भिंतीवर गाई, तळीं, शेतकऱ्यांच्या छोट्या छोट्या झोंपड्या यांची चित्रं टांगली होतीं. खिडकींतून बंदर, गोदींतील जहाजें, कोळसे घेऊन जाणाऱ्या बोटी दिसत. गोद्यांपर्यंत शहर जणूं वळसा घालीत आहे असं वाटे व शिडें गुंडाळलेल्या नांगरून पडलेल्या मच्छीमार होड्या, त्यांना दिसत. समुद्र किनारीं वाळत घातलेल्या माशांचा वास खिडकींतून येत असे.

खोलीच्या मधोमध एक मोठं टेबल असून तिथं मेजर हंटर बसला होता. मांडीवर ड्रॉइंगबोर्ड घेऊन त्यानं तो टेबलाला टेंकला होता, हातांत " टी स्केअर व त्रिकोण " घेऊन तो रेल्वेच्या नव्या साइडिंगचा नकाशा काढीत

होता. ड्रॉइंगबोर्ड एकसारखा हलत असल्यानं मेजर चिडला. " प्रॅकल ! " " लेफ्टनंट प्रॅकल ! " त्यानं मागं वळून हांक मारली.

बेडरूमचं दार उघडलं, एका गालाला दाढीचा साबण फासला आहे अशा स्थितींत प्रॅकल बाहेर आला. त्याच्या हातांत दाढीचा ब्रश होता. " काय ? " त्यानं विचारलं. मेजर हंटरनं हातांतील बोर्ड हलवून विचारलं. " सामानांत माझ्या बोर्डचा स्टँड आला नाहीं ? "- " मला माहीत नाहीं. प्रॅकलनं उत्तर दिलं. " मी पाहिलं नाहीं सामानांत. " " बरं, आतांच्या आतां शोध पाहूं ! आधींच या अशा उजेडांत काम करणं कठीण. मला हा नकाशा पुन्हां काढायला लागणार. " प्रॅकल म्हणाला, " दाढी करून झाली कीं पहातों, " मेजर चिडून म्हणाला; " हें पहा तुझ्या चेहऱ्यापेक्षां हें साइडिंग जास्त महत्वाचं आहे. गोल्फबॅगसारखी एकादी पिशवी त्या सामानांत आली आहे का पहा. "

प्रॅकल निघून गेला. उजव्या बाजूचं दार उघडून कॅप्टन लॉफ्ट आंत आला. त्याच्या डोक्यावर पोलादी शिरस्त्राण, डोळ्यांना दुर्बीण, व आंगावर लहान लहान चामडयाच्या पिशव्या लटकत होत्या. खोलींत आल्याबरोबर तो आपला जामानिमा उतरायला लागला.

तो बोलूं लागला. " हा आपला बेंटिक गाढव आहे शुद्ध ! चक्क फाटिग कॅप घालून डयूटीवर चालला होता, रस्त्यातून ! " त्यानं दुर्बीण काढून टेबलावर ठेवली, गॅस मास्कची पिशवी काढली. हळूहळू टेबलावर सामानाचा ढीग जमूं लागला. हंटर म्हणाला. " तें सामान टेबलावर नको टाकूं, तिथं मला काम करायचं आहे. बरं, बेंटिकनं कॅप घातली म्हणून काय झालं ? त्यामुळं कांही घोटाळा झाला नाहीं. या टिनच्या टोपडयांचा मला वीट आलाय्. इतकी जड असतात नि तीं घातलीं कीं धड दिसतही नाहीं. "

लॉफ्ट लगेच म्हणाला. " पण म्हणून त्या घालण्याचं सोडणं ही वाईट संवय आहे एथील लोकांच्या दृष्टीनंही ते वाईटच. आपण लष्करी शिस्त, व हुशारी राखली पाहिजे, व ती बदलतां कामां नये. आपण जर हें पाळलं नाहीं तर गोत्यांत आलोंच समजा. "

" कशावरून तुला असं वाटतं ? " हंटरनं विचारलं.

लॉफ्ट ताठ उभा राहिला. त्याच्या ओंठावर खात्री दिसत होती. प्रत्येक गोष्टीची त्याला खात्री असे, त्यामुळं त्याच्यावर सगळेजण उखडत. तो म्हणाला. " मला **वाटत** नाहीं. " व्याप्त देशांत कसं वागावं यासंबंधीचा मॅन्युअल X १२ यांतील मजकूर मी सोप्या भाषेंत लिहून काढीत होतों. खरोखरच याची व्यवस्थित माहिती मॅन्युअलमध्यें आहे. " तूं— " असं तो म्हणतच होता, पण लगेच त्यानं वाक्य फिरविलं " प्रत्येकानं मॅन्युअल X १२ फार काळजी-पूर्वक वाचलं पाहिजे . "

हंटर म्हणाला. " ज्यानं हें मॅन्युअल लिहिलं, तो स्वत: कधीं व्याप्त देशांत होता कीं नाहीं, याविषयी मला शंका आहे. हे लोक अगदीं निरुपद्रवी आहेत. ते चांगले, आज्ञाधारक दिसतात. "

प्रॅकल दार उघडून आंत आला. अजून त्याचें तोंड साबणानं माखलेलं होतं. त्याच्या हातांत तपकीरी रंगाची कॅन्व्हसची नळी होती. त्याच्या मागो-माग लेफ्टनंट टॉंडर आला. " हेंच का ? " त्यानं हंटरला विचारलं. " होय. उघड नि तो स्टँड उभा कर पाहूं. " प्रॅकल व टॉंडर दोघांनी स्टँड जोडला व बरोबर आहे कीं नाहीं तें पाहून हंटरपाशीं आणून ठेवला. मेजरनं स्क्रू फिरविले, बोर्ड स्टँडवर लावला, डाव्या उजव्या बाजूला हलवून सारखा केला, व तो आपल्या कामाला लागला.

कॅप्टन लॉफ्टनं प्रश्न केला. " लेफ्टनंट, तुझ्या तोंडावर साबण आहे याची शुद्ध आहे का तुला ? "

" होय, " प्रॅकलनं उत्तर दिलं. " मेजरनं मला स्टँड आणायला सांगितलं तेव्हां मी दाढी करीत होतों. "

" बरं, तोंड धू जा पाहूं. कदाचित् हें कर्नलला दिसेल. "

" हात्तिच्या ! त्याला त्याचं कांहीच वाटणार नाहीं. असल्या क्षुल्लक गोष्टींकडे त्याचं लक्षच नसतं. "

हंटर काम करीत असतांना, टॉंडर त्याच्या पाठीमागून पहात होता.

शेवटीं लॉफ्ट म्हणाला. " नसेल कदाचित् त्यांचं लक्ष, पण हें बरं दिसत नाहीं: "

प्रॅकलनं हातरुमाल काढून गालावरचा साबणाचा फेंस पुसला. टॉडर, मेजरच्या बोर्डावरील कोंपऱ्याच्या बाजूला बोट दाखवीत म्हणाला. " फार छान दिसतोय हा पूल, पण मेजर आपण जगांत पूल कुठं बांधणार आहोंत ? " इंटरनं ड्रॉइंगकडे पाहिलें व नंतर मागें वळून टॉडरकडे पाहिलं. छे तसा पूल आपण बांधीत नाहीं ! हें वरचं ड्रॉइंग आहे आपल्या कमाचं !

" मग हा छोटा पूल कशाला इथं काढलाय् ? "

इंटरला काय उत्तर द्यावं याची मोठी पंचाइत पडली. " त्यांचं असं आहे, माझ्या घराच्या मागील आंगणांत, मी एक छोटं रेल्वे लाईनचं मॉडेल बनवलंय्. एका छोटयाशा खाडीवर पूल बांधायचं माझ्या मनांत घोळत होतं. रेल्वे लाईन, मी खाडीपर्यंत आणली, पण पूल बांधायचा तसाच राहून गेला. म्हटलं बाहेर कुठं तरी गेलों कीं पूल बांधून काढूं. "

लेफ्टनंट प्रॅकलनं खिशांतून एक घडी केलेला फोटो काढला. त्याच्या घड्या उघडून फोटो वर धरून तो त्याच्याकडे पाहूं लागला. तो एका मुलीचा होता. तिच्या हातांत काळी लेस लावलेला पंखा असून त्याच्या आडून ती चोरट्या नजरेनं पहात होती. तिचा वर्ण गौरगुलाबी असून बांधा सुदृढ होता. पायांत तिनं काळे पायमोजे घातले असून, तिचें वक्षःस्थळ बरंच उघडं होतं तिचे पाय व पाचण्या आकर्षक दिसत होत्या. लेफ्टनंट प्रॅकलनें फोटो वर धरुन म्हटलं " आहे कीं नाहीं ? " लेफ्टनंट टॉडर फोटोकडे निरखून पाहिल्यावर म्हणाला. " छे. ! आपल्याला नाहीं पसंत. ' " कायरे, तिचं तुला काय आवडत नाहीं सांग ? " " मला ती आवडतच नाहीं. बरं पण हा फोटो तुला कशाला पाहिजे ? " प्रॅकल म्हणाला. " मला ती आवडते म्हणून-आणि मी पैज मारतों-तुलासुद्धां ती आवडते—खरं कीं नाहीं ? " " छे, ! मला नाहीं आवडत " टॉडरनं उत्तर दिलं. " कायरे तुला असं म्हणायचंय् कीं शक्य असलं तरी तूं तिची भेट घ्यायला जाणार नाहींस ? " " छे, ! "

प्रॅकल पडद्याच्या बाजूला जात असतां म्हणाला. " डोकं फिरलंय् तुझं ! मी हा फोटो इथं पडद्याला टांगून थोडावेळ तुला तिचं चिंतन करायला लावणार. " असं म्हणून तो फोटो त्यानं पडद्यावर टांगला.

कॅप्टन लॉफ्ट आपलें सामान गोळा करीत होता, त्याचं लक्ष फोटोकडे जातांच तो म्हणाला. " लेफ्टनंट, मला वाटतं हा फोटो इथं बरा दिसत नाहीं. तो कांढ पाहूं. हा फोटो पाहून इथल्या लोकांचं मत वाईट होईल. " हंटरनं आपली नजर बोर्डावरून वर केली. " काय म्हणालांत? कशानं लोकाचं वाईट मत होईल?" इतक्यांत त्याची दृष्टी फोटोवर गेली. " ही कोण ? " त्यानं एकदम विचारलं.

" ती नटी आहे, " प्रॅकल म्हणाला.

टॅांडर लगेच म्हणतो. " भटकभवानी आहे ती ! "

" अस्सं ! म्हणजे तुमच्या ओळखीची दिसते ? "

प्रॅकल टॅांडरकडे रोखून पहात होता. त्यानें टॅांडरला विचारलं " कशावरून रे ती भटकभवानी आहे म्हणतोस, सांग पाहूं ? "

" ती दिसतेच तशी, " टॅांडर उत्तरादाखल म्हणाला.

" तूं ओळखतोस तिला ? "

" नाहीं ! आणि ओळख करून घ्यायचीसुद्धां माझी इच्छा नाहीं. "

प्रॅकलनं पुनः विचारलं " मग तुला काय तिची माहिती ? " पण इतक्यांत, कॅप्टन लॉफ्ट म्हणाला " काढून टाक तो फोटो. तुला पाहिजे तर बिछान्यावर टांगून ठेव. ही लष्करी कचेरी आहे." प्रॅकल त्याच्याकडे बंडखोरासारखा पहात होता व तो पुढं कांहीं बोलणार, तोंच कॅप्टन लॉफ्टनं बजावलं " लेफ्टनंट हा हुकूम आहे. " बिचाऱ्या प्रॅकलनं फोटोची घडी करून खिशांत ठेवली. प्रॅकलनं विषय बदलण्याचा प्रयत्न करून पाहिला. " इथं कांहीं सुंदर पोरी आहेत. आपण इथं कायम राहून, सारं कांहीं सुरळीत चाललं, कीं झालं त्याच्याशीं मी ओळख करून घेणार आहे. " कॅप्टन लॉफ्ट म्हणाला. " त्यापेक्षां तूं मॅन्युअल X १२ वाच. त्यांत लैंगिक विषयासंबंधी एक प्रकरण आहे. " एवढं

बोलून तो हातांतील सामान सांभाळीत बाहेर गेला. लेफ्टनंट टॉंडर हंटरच्या खांद्यावरून, तो काढीत असलेला नकाशा पहात होता. "या कोळशाच्या गाड्या खाणींतून थेट बोटीपर्यंत येतात, हें फारच छान आहे. वाः!"

मेजर हंटर भानावर येऊन म्हणतो. "आपण झपाझप कामाला लागलं पाहिजे. तावडतोब कोळसा हालवायला लागायला हवं. फारच मोठं काम आहे ते. इथले लोक शान्त नि समजूतदार आहेत म्हणून बरं आहे."

आपलं सामान ठेवून, लॉफ्ट आंत येऊन खिडकीजवळ जाऊन उभा राहिला. त्याचं लक्ष खिडकीतून दिसणाऱ्या बंदराकडे व कोळशाच्या खाणीकडे होतें. शेवटीं तो म्हणाला. "लोक शांत नि समजूतदार आहेत, याच्या-बद्दल मला वाटतं आपण आपली पाठ थोपटली पाहिजे. बाबारे, म्हणून मी एकसारखा "प्रोसीजर प्रोसीजर," [ कार्यपद्धती ] म्हणून तुमच्या कानीं कपाळीं ओरडत असतों. खरोखर, मॅन्युअलमध्यें याचं काय सुंदर विवेचन केलं आहे."

दार उघडून कर्नल लॅन्सर आंत; आला येतांयेंतांच त्यानें कोट काढला होता. त्याच्या स्टाफनं येताक्षणींच लष्करी सलामी दिली. तो लॉफ्टला म्हणाला. "कॅप्टन लॉफ्ट, खालीं जाऊन कॅप्टन बेंटिकला ड्यूटीवरून मोकळां करशील का? त्याला चक्कर येईलसं वाटतं आहे."

"बरं जातो." लॉफ्ट म्हणाला, "पण मला असं सुचवायचंय् कीं मी आतांच ड्यूटीवरून आलोंय्."

कर्नल लॅन्सरनं त्याच्याकडे निरखून पहात विचारलं. "पण पुनः जायला, मला वाटतं तुझी हरकत नसेल?" "छे! मुळींच नाहीं. पण हें माझ्या रेकर्डमध्यें नमूद व्हावं, यासाठीं मी सांगितलं." लॅन्सर गालांतल्या गालांत हंसत म्हणाला. तुझं रिपोर्टांत नांव यायला पाहिजे किं नाहीं? यावं असं वाटतंना तुला."

"त्यांत कांहीं नुकसान नाहीं, आलं तर."

"आणि असं पुष्कळदां तुझं नांव येऊन गेलं मग तुझ्या छातीवर छोटासा बिल्ला लटकायला लागेल."

" लष्करी जीवनपथावरील मैलाचे दगड आहेत ते विल्हे."
लॅन्सरनं निश्वास सोडला. " हं. असतील कदाचित्. पण कॅप्टन त्यांची तुला आठवण येणार नाहीं." " कां ?" लॉफ्टनं विचारलं.

" माझ्या म्हणण्याचा अर्थ, तुला कांही वर्षांनी कळेल कदाचित्."
कॅप्टन लॉफ्टनं भराभर जामतनिमा चढवायला सुरुवात केली. " यस् सर !" म्हणून तो निघून गेला. लांकडी जिन्यावर त्याच्या बुटाचा खट् खट् आवाज ऐकूं येत होता. त्याच्याकडे पहातांना लॅन्सरला एक प्रकारची गंमत वाटत होती. तो शान्तपणं म्हणाला. " हा खरा हाडाचा शिपाई." हंटरनं मान वर केली. व पेन्सिल उचलून म्हणाला. " हाडाचा गद्धा!"

" तसं नाहीं," लॅन्सर बोलूं लागला. " पुष्कळजण ज्याप्रमाणं मुत्सद्दी-गिरीचे धडे गिरवून गिरवून राजकारणी पुरुष बनतात, त्याप्रमाणं लॉफ्ट, शिपाई, बनत आहे. थोडयाच काळांत, तो जनरल स्टाफवर जागा पटकावील. युद्धाकडे तो अंमलदाराच्या दृष्टीनं पहायला लागेल व तें त्याला नेहमीं आवडेल." लेफ्टनंट प्रॅकलनं विचारलं " कर्नल साहेब, लढाई कधी संपणार, तुम्हांला वाटतं ?"

" संपणार ? संपणार म्हणजे काय ?"
लेफ्टनंट प्रॅकल म्हणाला. " म्हणजे आपण लढाई कधीं जिंकणार ?" कर्नल लॅन्सरनं मान हलविली. " मी काय सांगू ? अजून जगांत आपले शत्रू जिवंत आहेत." " पण आपण त्यांना धूळ चारणार." प्रॅकल म्हणाला.

" हं" " काय ? नाहीं चारणार ?" प्रॅकलनं विचारलं " हो! तर आपण नेहमींच शत्रूला धूळ चारतों."

प्रॅकल आनंदित होऊन म्हणतो " समजा, नाताळच्या सुमारास लढाई थांबली तर आम्हांला रजा मिळेल ?"

कर्नल लॅन्सरनं उत्तर दिलं. " मला काय माहीत ? अशी परवानगी जर्मनीहून ( घरून ) आली पाहिजे. कां नाताळांत घरीं जायचंय तुला ?"
" हो, जायला मिळालं तर."
" मिळेल! मिळेल कदाचित्" कर्नल म्हणाला.

लेफ्टनंट टॉडरनं विचारलं. " लढाई नंतर, आम्हांला इथं राहूं देतील कीं नाहीं. ? "

" मला कांहीं सांगतां येत नाहीं. पण कां बरं ? " कर्नलनं विचारलं.

" त्याचं असं पहा, " टॉडर बोलूं लागला " कीं हा देश सुंदर आहे, इथले लोक चांगले आहेत. आपल्यांतले कांहीं इथं स्थाईक होतील.

लॅन्सर थट्टेनं म्हणाला, " तूं कुठं तरी बस्तान बसविले आहेस, असं दिसतंय. "

" तशी इथं कांहीं उत्तम शेतं आहेत, " टॉडर म्हणाला, " चार पांच शेतांची एक इस्टेट केली तर रहायला छान ठिकाण आहे. "

" तुझी कांहीं वडिलोपार्जित जमीन नाहीं वाटतं ? " लॅन्सरनं विचारलं.

" छेः आतां तसूभरसुद्धां उरली नाहीं. चलनवाढीमुळं सगळी साफ झाली. "

लॅन्सरला या पोराशीं बोलायला आतां कंटाळा आला होता. तो म्हणाला.

" अजून आपल्याला लढायच आहे. अमून कोळसा काढायचाय. इस्टेटी करायला आपण युद्ध संपायची वाट पहात बसूं असं वाटतं तुला ? धरून असे हुकूम येतीलच कॅप्टन लॉफ्टला विचारा पाहिजे तर. " कॅर्नल लॅन्सरचा नूर पालटला. तो हंटरला म्हणतो " हंटर, उद्यां पोलाद येईल. या आठवड्यांत तुमचा रस्ता सुरू करतां येण शक्य आहे. "

इतक्यांत कुणीतरी दार वाजविलं; पहाऱ्यानं डोकवून पाहिलं व म्हणाला.
" कर्नल, मि. कोरेल आपल्याला भेटायला आले आहेत. "
" त्याला आंत यऊं दे. " कर्नल इतरांकडे वळून म्हणतो. " याच गृहस्थानं इथं आपण येण्यापूर्वी तयारी केली होती. कदाचित् त्याचं आपलं बिनसायचा संभव आहे. "

" खरोखरच त्यानं चांगलं काम केलं का ? " टॉडरनं विचारलं. " हो केलं खरं. तो इथल्या लोकांना आवडणार नाहीं. आपल्याला देखील तो आवडेल कीं नाही याची मला शंकाच आहे. " " खरोखरीच त्याला शाबासकी द्यायला पाहिजे. " टॉडर म्हणाला. " हं आणि ती तो उपटल्याखेरीज रहाणार नाहीं हें पक्कं समजा. " कर्नल लॅन्सर म्हणाला.

कोरेल हात चोळीतच आंत आला. त्याच्या तोंडावर सदिच्छा व स्नेह विराजत होता. त्याच्या आंगात नेहमीचा काळा सूट होता. पण कपाळावर, जखमेवर बांधतात तशी बॅंडेजची फुली असून तिची टोंकं केसाना चिकटविली होतीं. तो पुढं होत म्हणाला, " गुड मॉर्निंग कर्नल, कालच्या गडबडीनंतर वास्तविक मी कालच तुम्हांला भेटायला यायला पाहिजे होतं, पण आपण किती कामांत असाल हें मला माहित होतं. "

" गुड मॉर्निंग. " नंतर सभोंवार हात फिरवून कर्नलनं ओळख करून दिली. " मि. कोरेल हा माझा स्टाफ. "

" वा छान त्यांनी छान कामगिरी बजावली. पण मींच त्यांची पूर्व तयारी करून ठेवली होती म्हणा. "

हंटरनें दौतींत टांक बुडवून काम चालूं केलं.

लन्सर म्हणाला. " तुम्ही ठीक काम केलंत. पण मला वाटतं, त्या सहा-जणांना मारलं नसतं तर बरं झालं असतं. ते आले नसते तर चांगलं झालं असतं. "

कोरेल हात पसरून थाटांत म्हणतो. " या शहराच्या मानानं सहा माण-सांचे प्राण म्हणजे कांहींच नाहीं. शिवाय इथं कोळशाची खाण आहे हें विसरतां कामा नये. "

कर्नल करड्या सुरांत म्हणाला. " माणसांना ठार मारून जर भागत असेल तर त्याला माझी ना नाहीं, पण कधीं न मारणं बरं ठरतं. "

कोरेल ऑफिसर्सकडे निरखून पहात होता. लेफ्टनंटसूकडे तिरक्या नजेरनं पहात त्यानं कर्नलला विचारलं. " कर्नल मला आपल्याशी खाजगी बोलायचय् बोलू का ? "

" खुशाल; लेफ्टनंट प्रॅंकल, लेफ्टनंट टॅांडर, आपल्या, खोलींत जा पाहूं. " कर्नल कोरेलला म्हणतो. " मेजर हंटर कामांत गुंतलेला आहे. तो कामांत असला कीं त्याला कांहीही ऐकूं येत नाहीं. " हंटरनं वर मान करून किंचित् स्मित केलं, व पुनः त्याची नजर खालीं झाली. ते तरुण लेफ्टनंट खोलींतून बाहेर गेले असे पाहून लॅन्सर म्हणाला. " हं बोला पाहूं बसा ना. " " थॅंकयू सर " म्हणत कोरेल टेबलापाशीं बसला. लॅन्सरचं लक्ष कोरेलच्या कपाळाकडे जातांच त्यानं विचारलं: " लोकांनी एव्हांच तुला ठार मारायचा प्रयत्न केला वाटतं ? "

कोरेलनं बँडेज चांचपले. " हें ? ह्य. ! सकाळीं येतांना टेंकडीवरून दगड पडला त्यामुळं लागलंय्. " " दगड फेंकला नव्हता अशी तुझी खात्री आहे ? "

" म्हणजे, म्हणायचंय काय तुम्हांला ? अहो हे लोक तसें भयंकर नाहींत. गेल्या चारशें वर्षांत युद्ध कशाशीं खातात हें सुद्धां यांना ठाऊक नाहीं. लढायचं देखील हे लोक पार विसरून गेले आहेत. " " तुम्हाला त्यांची माहिती, कारण तुम्ही त्यांच्यात राहिलेले आहां, " कर्नल कोरेलच्या अगदीं जवळ येऊन म्हणतो. " पण तुला जर कांही दगा फटका झाला नसेल, तूं जर अजून अगदीं सुरक्षित राहिला असशील, तर मग हे लोक जगावेगळे आहेत असं म्हटले पाहिजे. यापूर्वी मी अनेक देश जिंकायला मदत केली आहे. .वीस वर्षां पूर्वी मी बेल्जम व फ्रान्समध्यें होतों. " एकदम त्यानें डोकं हलविलं व करड्या आवाजांत म्हणाला. " तूं खरोखरच बडी कामगिरी बजावली आहेस. आम्ही तुझे आभार मानले पाहिजे. माझ्या रिपोर्टांत मी तुझ्या कामगिरीचा उल्लेख केला आहे. "

" थँक यू सर, " कोरेल म्हणाला. " मी माझ्याकडून कमाल केली. " लॅन्सर कंटाळवाण्या सुरांत म्हणतो. " बरं, मग आतां पुढं काय करायचं ! तुझ्या मनांतून राजधानीला परत जायचंय् का ? जर तुला घाई असेल तर कोळशाच्या बोटींतून आम्ही तुला पोंचविण्याची सोय करूं, नि जर थांबावयची तयारी असेल तर विनाशिकेंतून पाठवूं. "

कोरेल म्हणाला. " पण मला जायचं नाहीं. मी इथंच राहणार. " लॅन्सर क्षणभर विचार करून म्हणाला. " माझ्यापाशीं फारशीं माणसं नाहींत, हें मी तुला सांगायला नको, तेव्हां तुला पुरेसे शरीरसंरक्षक देणं मला शक्य नाहीं. " " पण मला शरीरसंरक्षकांची बिलकुल जरूर नाहीं. माझं ऐका तुम्हीं, हे लोक, बंडखोर, घातपाती, अत्याचारी नाहींतच मुळी. "

लॅन्सरनं त्याच्या कपाळावरील बँडेजकडे पाहिलं. हंटरनं बोर्डावरून नजर वर फिरवीत म्हटलं. " मि. कोरेल, आपण हेल्मेट [ पोलादी टोपी ]घालायला लागाल तर बरं होईल." असं म्हणून तो पुनः हातांतील नकाशाकडे पाहूं लागला.

कोरेल खुर्चीतल्या खुर्चीत पुढं सरकला. " कर्नल, मला आपल्या एक-ट्याशींच कांहीं बोलायचं होते. मला वाटतं कीं मुलकी राज्यकारभाराच्या कामांत मला मदत करतां येईल. "

लॅन्सर टांचेवर वळून खिडकीपाशीं गेला, त्यानं बाहेर पाहिलं व पाठ फिरवून म्हणाला. " तुझ्या मनांत काय आहे तें सरळ सांग पाहूं. "

" तुमच्या विश्वासातील असा मुलकी अधिकारी इथं असला पाहिजे. तेव्हां मी असा विचार केला कीं, मेयर ऑर्डेनच्या जागेवर जर मी असलों, तर मग मुलकी नि लष्करी कामं सुरळीत चालूं शकतील. " लॅन्सरचे डोळे विस्फारितं होऊन चमकायला लागले. " हें तुझ्या रिपोर्टात लिहिलंयस कां तूं ? " कर्नलनं विचारलं. कोरेलनं उत्तर दिलं. " अर्थात्. माझ्या छाननीवजा रिपोर्टात हें आलं आहे. " लॅन्सर म्हणाला. " आम्हीं इथं आल्यापासून तूं गांवात कुणाला भेटलास कां कुणाशीं बोललास का ? मेयर शिवाय इतर कुणाशीं ? "

" अं हं नाहीं. असं पहा कीं लोक एकदम दचकून गेले आहेत. त्यांना या स्वारीची कल्पनासुद्धां नव्हती. " तो गालांतल्या गालांत हंसून म्हणतो. "छे स्वारीची त्यांना कल्पनाही नव्हती. " पण लॅन्सरनं आपला मुद्दा सोडला नाहीं. त्यानं विचारलं. " म्हणजे लोकांच्या मनांत काय चाललंय् हें खरोखरीच तुला ठाऊक नाहीं. "

" चाललंय् काय ? ते घाबरून गेले आहेत. ते जवळ जवळ स्वप्नांतच आहेत. "

" त्यांचं तुझ्याबद्दल काय मत आहे, आहे ठाऊक तुला ? "

" माझे इथं अनेक मित्र आहेत. माझी प्रत्येकाशीं ओळख आहे. "

" आज सकाळीं तुझ्या दुकानांत कुणी गिऱ्हाइक आलं होतं ? "

" त्याचं असं आहे किं, धंदा व्यापार जवळ जवळ बंदच आहे. " कोरेल म्हणाला. "आजकाल कुणी कांही विकत घेत नाहीं." लॅन्सर कंटाळून खुर्चीवर बसला. डावापाय उजव्या पायावर ठेवीत, तो म्हणाला. " तुझं काम मोठ्या जोखमीचं नि धडाडीचं आहे. त्याला बक्षिसीसुद्धां भरभक्कम मिळाली पाहिजे. "

“ थँक यू सर. ” मि. कोरेल म्हणाला.

“ थोड्या दिवसांत लोक तुझा द्वेष करायला लागतील. ” कर्नल म्हणाला.

“ कांही हरकत नाहीं. मला त्याची पर्वा नाहीं कारण ते माझे शत्रू आहेत. ”

लॅन्सर बोलण्यापूर्वी कितीतरी वेळ घुटमळत होता. सरतेशेवटीं त्यानं हलक्या आवाजांत सुनावलं. “ मि. कोरेल, आम्हीसुद्धां तुला मान देणार नाहीं. ”

कोरेल एकदम दचकून उठला. “ असं बोलणं पुढाऱ्याच्या (हिटलरच्या) धोरणाच्या विरोधी आहे. पुढारी असं म्हणालाय्” कीं सगळ्या शाखा सारख्याच मानाच्या आहेत. (मी तुमच्या येण्याची पूर्व तयारी करण्याच्या शाखेतील म्हणून, तुम्हीं मला मान देणार नाहीं-हें पुढाऱ्याच्या धोरणाविरुद्ध आहे.)

लॅन्सर सावकाश बोलूं लागला. “ अशी माझी अपेक्षा आहे. पुढाऱ्याला शिपायांची मनं जाणतां येतात, असं मला वाटतं. ” नंतर अनुकंपापूर्ण स्वरांत म्हणतो. “ खरोखरच तुला बडं बक्षिस मिळालं पाहिजे. ” जरावेळ तो तसाच बसून राहिला व नंतर कसला तरी विचार करून, नूर बदलून म्हणतो. “ आतां आपण स्पष्टच बोलू या. इथं सारं कांहीं माझ्या अधिकारांत आहे. इथल्या खाणीतून कोळसा काढणं हें माझं काम. हें काम करायचं म्हणजे मला शहरांत शिस्त नि सुव्यवस्था राखली पाहिजे, ती राखायची म्हणजे एथील लोकांच्या मनांत काय चाललं आहे हें मला कळलं पाहिजे. इथं बंड होणार, अशी मला आगाऊच अटकळ बांधली पाहिजे. आलं लक्ष्यांत काय मी म्हणतोंय तें ? ”

“ तुम्हांला जे कळायला हवं आहे, तें मी शोधून काढीन. मेयर म्हणून माझी तुम्हाला अमूल्य मदत होईल. ”

लॅन्सरनं मान हलविली. “ याबाबतींत मला हुकूम नाहीं. इथं मी माझी बुद्धि वापरूनच निर्णय घेतला पाहिजे. मला वाटतं, एथील जनतेच्या मनांतील हालचाल तुला यापुढं कधींही कळणार नाहीं. मला वाटतं तुझ्याशीं कुणी बोलायला तयार होणार नाहीं, पैशावर जगतील असे (भाडोत्री) तुझ्या भोंवती गोळा होतील. इतकंच नव्हे तर गार्ड शिवाय फिरण्यांत तुझ्या जिवाला मोठा धोका आहे. माझ्या मतं, तूं राजधानीला निघून जावं. तिथं तुझ्या अतुल कामगिरीबद्दल तुला बक्षिशी मिळेल. ”

" पण माझं स्थान इथं आहे कर्नल." कोरेल म्हणाला. मी माझं स्थान तयार केलं आहे–या सगळ्या गोष्टी माझ्या रिपोर्टांत आल्या आहेत."

लॅन्सर त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत म्हणतो. " मेयर ऑर्डेन हा नुसता नांवाचा मेयर नाहीं. मेयर ऑर्डेन म्हणजे इथली जनता. इथले लोक काय करीत आहेत, कसला विचार करताहेत, हें न विचारतां त्याला कळतं, कारण लोकांच्या मनांत जो विचार तोच त्याच्या मनात येणार. त्याच्यावर नजर ठेवली म्हणजे लोकांची मनं मला कळतील. ऑर्डेनच मेयर राहिला पाहिजे, असं माझं स्पष्ट मत आहे."

कोरेल म्हणाला. " माझ्या कामगिरीबद्दल, इकालपट्टीहून अधिक चांगली बक्षिशी मिळायला हवी."

" खरंच तुझी कामगिरी थोर आहे, व आम्हीं तुला याच्याहीपेक्षां चांगलं वागविलं पाहिजे यांत तिळमात्र संशय नाहीं. पण आमच्या पुढील मोठ्या कार्यांत आम्हांला तुझा अडथळा होत आहे. तुझी कामगिरी थोर असली तरी आज ती आमच्या मार्गांतील धोंड ठरते लोक आज नाहीं तरी उद्यां तुझा द्वेष करायला लागतील. एकाद्या लहानशा बंडात, लोक पहिला बळी तुझा घेतील. तेव्हां मला असं वाटतं, तूं राजधानीला परत जावं."

कोरेल थोडया ताठ्यांत म्हणाला " पण मी राजधानीला पाठविलेल्या रिपोर्टांचं उत्तर येईपर्यंत तरी मला वाट पाहूं द्याल कीं नाहीं ?"

" हो हो, केव्हांही पण तुला सुरक्षित रहायचं असेल तर, तूं ताबडतोब राजधानीला जावं असं मी म्हणेन. स्पष्टच बोलायचं तर मि. कोरेल, तुझी आज इथं किंमत राहिली नाही. पण हं अजून दुसरे देश आहेत निराळे बेत आहेत कदाचित् एकाद्या नव्या देशांत परक्याशहरांत तुला पाठवितां येईल. नव्या क्षेत्रांत तुझ्या आंगी नवा आत्मविश्वास तयार होईल. कदाचित् तुला एकाद्या याहीपेक्षां मोठ्या शहरात ठेवून तुझ्यावर मोठी जबाबदारी टाकण्यांत येईल. तुझ्या इथल्या कामगिरीबद्दल, मी तुझी चांगली शिफारस करीन."

कोरेलच्या डोळ्यांत संतुष्टपणा चमकला. " थँक यू सर, मी बरंच काम केलंय्. कदाचित् तुमचं म्हणणं खरं असेल. पण राजधानीहून उत्तर येईपर्यंत थांबण्याची तुम्हीं मला परवानगी दिली पाहिजे."

कर्नलचे डोळे आकुंचन पावले. तो कठोरपणानं म्हणाला. " कोरेल, डोक्यांत हेल्मेट घाल, घरांतून बाहेर पडूं नको, आणि मुख्य म्हणजे दारूला शिवूं नको. कुणा स्त्रीवर किं पुरुषावर विश्वास ठेऊं नको समजलं ? "

कोरेलेनं दयार्द्र दृष्टिनं कर्नलकडे पाहिलं. " तुम्हांला समजत नाहीं. कर्नल. माझं इथं छोटंसं घर आहे. घरांत लहानशीं सुंदर मोलकरीण आहे. मला वाटतं तिचं माझ्यावर प्रेमसुद्धां आहे. हे लोक साधे, शांततामय आहेत. मी त्यांना चांगले ओळखतों. "

लॅन्सर उद्‌गारला. " लोक शांततामय नाहींत, हें तुला केधीं कळणार ? लोक मित्रभावानं वागणार नाहींत हें तुला कसं समजत नाहीं ? आम्हीं या देशावर स्वारी केली, तूं–त्यांच्या म्हणण्याप्रमाणं देशद्रोही बनून, आम्हीं येण्याची पूर्व तयारी केलीस. " त्याचा चेहरा लालबुंद होऊन आवाज चढूं लागला. " आम्हीं इथल्या लोकांवर युद्ध पुकारलं आहे, हें कसं तुला कळत नाहीं ? "

कोरेल तोऱ्यांत म्हणाला. " आपण त्यांचा पराभव केला आहे. "

कर्नल उठून उभा राहिला व निराशेनं हात हालवूं लागला. हंटरनं वर पाहिलं व बोर्ड हलूं नये म्हणून घट्ट धरला." तो म्हणाला. " हं हळू हळू कर्नल. मी नकाशां शाईनं काढतोंय्. पुनः पहिल्यापासून करायची माझी तयारी नाहीं. "

लॅन्सरनं त्याच्याकडे पाहून, " सॉरी ! " म्हटलं. आपण वर्गा समोर उभं राहून शिकवीत आहों अशा थाटांत म्हणाला. " पराभव क्षणिक असतो, तो टिकत नाहीं. आम्हीं पराभूत होतों, पण आम्हीं आज हल्ला चढवीत आहों. पराभव शब्दाला कांहीं अर्थ नाहीं–हें कसं नाहीं तुझ्या ध्यानांत येत ? दारं बंद करून लोकांची काय कुजबुज चालली आहे–ठाऊक आहे तुला ? "

कोरेलनं विचारलं "–तुम्हांला आहे ठाऊक ? "

" नाहीं–पण मला संशय येत आहे. "

यावर कोरेल कावेबाजपणानं विचारतो. " कर्नल, तुम्हांला भीति वाटते ! या स्वारीच्या कमांडरला भीतिनं पछाडावं ? " कर्नल कष्टानं खालीं बसत म्हणाला.

" हं तेंच असेल. " तो कंटाळून म्हणाला. " जे कधीं लढले नाहींत त्यांना–सुद्धां हे सगळं माहीत आहे—मला आतां याचा अगदीं वीट आला आहे, " हनुवटी हातांत धरून कर्नल सांगूं लागला, " मला ब्रुसेल्सच्या एका म्हातारीची आठवण आहे. तिचा तोंडवळा गोड असून केस पांढरेशुभ्र होते. ती अवघी चारफूट अकरा इंच उंच होती—व तिचे हात नाजुक होते. इतके नाजुक, कीं तिच्या हातावरील काळ्या शिरासुद्धां स्पष्ट दिसत. तिच्या अंगावर नेहमी काळीशाल असायची. आमची राष्ट्रीय गाणीं ती कांपऱ्या पण गोड आवाजांत म्हणायची. सिगरेट किंवा पैसा कुठं मिळेल हें ती अचूक हेरायची." त्यानं हनुवटीवरून हात काढला—व झोंपेतून खडबडून जागा झाल्यासारखा होऊन म्हणाला. "तिच्या मुलाला फांशी देण्यांत आलं होतं, ही गोष्ट आम्हांला ठाऊक होती. आम्ही तिला गोळी घालून ठार मारण्यापूर्वी, तिनं एका लांब काळ्या हॅट पिननं, आमच्यांतल्या बाराजणांना मारलं. त्या काळ्या पिनवर, लाल व निळ्या रंगाचा पक्षी आहे. अजून मी ती पिन घरीं जपून ठेवली आहे. " कोरेलनं विचारलं. " पण तुम्ही तिला गोळी घातलीत ? "

" अर्थात् घातली म्हणजे ? "

" आणि खून व्हायचे थांबले ? " कोरेलनं विचारलं.

" नाहीं. खून व्हायचे थांबले नाहींत. आम्हीं जेव्हां शेवटीं माघार घेऊं लागलों, तेव्हां मागं पडणाऱ्या कांही शिपायांना, लोकांनीं जाळलं, कांहींचे डोळे काढले, व कांहीं जणांना खिळे ठोकून फांशी दिलं. "

कोरेल मोठ्यानं म्हणाला. " कर्नल, अशा गोष्टी बोलणं चांगलं नाहीं."

यावर लॅन्सर म्हणतो, " अशा गोष्टीं आठवणं चांगलं नाहीं. "

कोरेल म्हणाला " तुम्हांला जर भीति वाटत असेल, तर तुम्ही स्वारी करणाऱ्या सैन्याच्या मुख्य पदावर असूं नये. " लॅन्सरनं थंडपणं उत्तर दिलं. "लढावं कसं हें मला समजतं. एवढं जर समजत असेल, तर निदान तुमच्या हातून वेडगळपणाच्या चुका होणार नाहींत. "

" तुम्ही तरुण ऑफिसर्सशीं अशा तऱ्हेनं बोलतां, कर्नल ? "

कर्नलनं नकारात्मक मान हलविली. " छे ! त्यांचा माझ्यावर विश्वास बसणार नाहीं, असं बोललों तर. "

" मग मला कशाला सांगतां ? "

" त्यांचं असं आहे मि. कोरेल. तुझी कामगिरी पार पडली आहे. मला आठवतं एकदां— — "

तो पुढं बोलणार इतक्यांत जिन्यावर पावलं वाजलीं व दार उघडलं गेलं. पहारेकऱ्यानं डोकावलं व कॅप्टन लॉफ्ट झटकन् पुढं झाला. लॉफ्टचं शरीर ताठरलं असून त्याच्या चर्येवर लष्करी शांतपणा दिसत होता.

" कर्नल. गडबड झालीय्. " " गडबड ! "

" होय. कॅप्टन बेंटिकला ठार मारण्यांत आलं–असा मला रिपोर्ट करायचाय्. "

" हं–हं—बेंटिक ? "

इतक्यांत पुन: जिन्यावर पावल वाजलीं. दोघेजण स्ट्रेचर घेऊन आले. स्ट्रेचरवर ब्लँकेटांत गुंडाळलेलं शरीर होतं. " बेंटिक मेला आहे–अशी तुझी खात्री आहे ! " " पक्की खात्री आहे. " लॉफ्ट करारी सुरांत म्हणाला.

भयभीत झालेले लेफ्टनंटस्, आ वासूनच खोलींत आले. लॅन्सर म्हणाला. " खालीं ठेवा. "

त्यानं खिडकीजवळ भिंतीशी स्ट्रेचर ठेवायला सांगितलं. स्ट्रेचर उचलणारे निघून गेल्यावर, लॅन्सरनं गुडघे टेंकले, ब्लँकेटचा कोंपरा उचलला व लगेच खालीं ठेवला. वांकलेल्या स्थितींतच त्यानं लॉफ्टला विचारलं.

" कुणाचं हें काम ? " " एका खाण कामगाराचं. " लॉफ्ट म्हणाला.

" कां मारलं त्यानं ? " " मी तिथं हजर होतों कर्नल. "

" अच्छा ! रिपोर्ट तयार कर जा पाहूं ! जा, रिपोर्ट तयार कर ! "

कॅप्टन लॉफ्ट ताठ उभा रहात, सहजगत्या सांगूं लागला. " कर्नलच्या हुकुमाप्रमाणं मी कॅप्टन बेंटिकला ड्यूटीवरून नुकतंच मोकळं केलं होतं. कॅप्टन बेंटिक इकडे यायला निघाला होता, इतक्यांत, काम सोडण्याची इच्छा असलेल्या, एका बंडखोर खाणकामगाराची व माझी बाचाबाची झाली. मी त्याला काम करायचा हुकुम केल्याबरोबर, पिकाव उचलून तो माझ्यावर धांवला. कॅप्टन बेंटिकनं मध्यें पडायचा प्रयत्न केला. " लॉफ्टनं बेंटिकच्या शरीराकडे हात दाखविला.

लॅन्सरनं अजून गुडघे टेंकलेले होते, त्यानं मान हलविली. तो म्हणाला. " बेंटिकचा स्वभाव विचित्र होता. त्याचं इंग्लिशांवर प्रेम होतं. त्यांची प्रत्येक गोष्ट त्याला आवडायची. त्याला लढायची मोठी आवड होती, असं नाहीं वाटत मला... .... ...बरं तूं त्या खाणकामगाराला पकडलंस ? " " होय ! " लॅन्सर उठून उभा राहिला. तो जणूं स्वगतच बोलत होता. " हूं पुन: सुरवात झाली म्हणायची. आम्ही या खाणकामगाराला गोळी घालणार नि नवे वीस शत्रू तयार करणार. एवढंच आम्हांला माहित आहे. एवढंच कळतं आम्हांला." प्रॅकलनं विचारलं. " काय म्हणालांत ? " कर्नल म्हणाला, " कांहीं नाहीं. मी केवळ विचार करीत होतों. " तो लॉफ्टकडे वळून म्हणाला," मेयर आर्डनला माझा सलाम सांग, आणि म्हणावं मला तावडतोब भेट घ्यायची इच्छा आहे. फार महत्वाचं काम आहे. " मेजर हंटरनं वर पाहिलं, टांक पुसला व मखमलीच्या पेटींत ठेवून दिला.

---

# प्रकरण ३ रें.

शहरांत लोक उदासवाणे होऊन फिरत होते. त्यांच्या डोळयांतील आश्चर्य मावळलं असलं, तरी त्याची जागा अजून द्वेषानं भरून काढली नव्हती. कोळशाच्या खाणींत कामगार खिन्नपणं गाड्या ढकलीत होते. छोटे दुकानदार मालाची विक्री करीत, पण गिऱ्हाईकं त्यांच्याशीं चकार शब्द बोलत नसत. लोक आपसांतसुद्धां कामापुरतं-होस हो, व नास ना-असं बोलत. प्रत्येकजण युद्धाचा विचार करी, स्वतःचा विचार करी, भूतकालाचा विचार करी, व एकदम हें सारं कसं बदललं, यांचं त्याला आश्चर्य वाटे.

बाहेर धुकं पडलं असल्यानं व हवेंत गारठा पडल्यानं, मेयर ऑर्डनच्या दिवाणखान्यांत दिवे लागले असून, शेगडींत विस्तव दिसत होता. दिवाणखान्याचा रागरंग बदलला होता. खुर्च्या मागं सारल्या होत्या, छोटीं टेबलं वाटेंतून बाजूला करण्यांत आलीं होतीं; उजव्या बाजूच्या दारांतून, जोसेफ व ॲनी, मोठं चौकोनी जेवणाचें टेबल, आंत आणण्याची खटपट करीत होती. जोसेफ दिवाणखान्यांत असून, ॲनीचा लाल चेहरा दारांतून दिसत होता जोसेफनं टेबल आडवं केलं, व खूर दारांतून आंत घेत म्हणाला." ॲनी, ढकलूं नको हं !"

"हं" नाकडोळे लाललाल झालेली ॲनी म्हणाली. आधींच तिचा स्वभाव रागीट होता. त्यांतून ही स्वारी, हे शिपाई, या साऱ्या वातावरणानं ती अधिकच चिडखोर बनली. काय आश्चर्य आहे पहा ! रागीटपणा हा वास्तविक दुर्गुण, इतके दिवस तो दुर्गुणच समजत असत-त्याचं एकदम देशभक्तींत रुपांतर झालं. शिपायांवर आधणाचं पाणी फेंकल्यापासून-हें तिचं कार्य स्वातंत्र्याचं द्योतक ठरलं. तिच्या वाटेला कुणीही गेलं असतं, तर तिनं हेंच केलं असतं पण आज ती शूर नायिका बनली. या ॲनीच्या विजयाचं मूळ

रागांत असल्यानं, ती अधिकाधिक रागीट बनून, चवताळून जाऊन, नवेनवे विजय हस्तगत करूं लागली.

"हूं-टेबल अडकेल,"-जोसेफनं बजावलं-खरोखरच टेबल दारांत अडकून बसलं. "हळू-घाई नको करूं." "छे,! मी नाहीं घाई करीत," ॲनींनं उत्तर दिलं.

जोफेस बाजूला उभा राहून टेबलाचा कोणता भाग अडकला आहे तें न्याहाळून पाहूं लागला. ॲनी हात पसरून त्याच्याकडे रागानं पहात होती. त्यानं खूर हालवून पाहिला. "हं, ढकलूं नको-हं जोरानं नको ढकलूं." तो म्हणत होता त्यानं एकस्यानं टेबल दारांतून बाहेर काढलं, ॲनी त्याच्या मागं होती. "हं गेलं एकदाचं," जोसेफ म्हणाला. दोघांनी तें नीट उभं करून खोलीच्या मधोमध नेऊन ठेवलं. "जर आपल्या साहेबांनी सांगितलं नसतं, तर मी टेबलाला हात लावला नसता. टेबलं हालवायला लावण्याचा यांना काय अधिकार?" ॲनी म्हणाली.

"मी म्हणतों इथं येण्याचा तरी त्यांना काय अधिकार?"

"कांहींच नाहीं." ॲनी म्हणाली.

"कांहीं नाहीं." जोसेफनं तिचे शद्ब उच्चारून म्हटलं. "मला वाटतं त्यांना अधिकार नाहीं, तरी ते खुशाल तोफा नि पॅराशूटच्या जोरावर वाटेल ते करतात-ॲनी, खरोखरच ते वाटेल तें करतात."

"त्यांना बिलकुल अधिकार नाहीं." ॲनी म्हणाली. "इथं कशाला मरायला त्यांना टेबल हवं आहे? ही कांहीं जेवायची खोली नाहीं."

जोसेफनं खुर्ची उचलली व टेबलापासून योग्य अंतरावर व्यवस्थित लावून ठेवली. "ते इथं अलेक्झांडर मॉर्डनची चौकशी करणार आहेत." जोसेफनं सांगितलं.

"मॉली मॉर्डनचा नवरा?"

"हो. मॉली मॉर्डनचा नवरा."

"त्या माणसाचं पिकावानं डोकं फोडल्याबद्दल?"

"हूं" जोसेफ म्हणाला.

" पण अलेक्झांडर चांगला माणूस आहे. त्याची चौकशी करण्याचा त्यांना काडीइतका अधिकार नाहीं. मॉलीच्या वाढदिवसाला त्यानं तिला उंची लाल कपडे दिलं. "

" अलेक्सची चौकशी करायचा त्यांना काय अधिकार ? "

" पण त्यांनं या माणसाला ठार मारलं ना ? "

" समजा, मारलं असलं. त्या इसमानं अलेक्सला हुकूम केला. मी तें सगळं ऐकलं आहे. अलेक्सला कुणी हुकूम फर्माविलेला खपत नाहीं. अलेक्स, त्याच्या काळांत म्युनिसिपालिटीचा सभासद होता. त्याचे वडीलसुद्धां सभासद होते. मॉली मॉर्डन केक इतके खुमासदार करते. पण तरी तिचे केक थोडे बिघडतातच. बरं पण ते अलेक्सचं काय करतील ? "

" गोळी घालतील " जोसेफ खिन्नपणं म्हणाला.

" ते त्यांना करतां येणं शक्य नाहीं. "

" बरं ॲनी त्या खुर्च्या इकडे दे पाहूं. ते शक्य आहे. ते आतांच करतील. "

ॲनीनं बोट ताठ करून त्याच्यासमोर नकारार्थी हलविलं. ती संतापून म्हणाली. " मी काय म्हणतें तें ध्यानांत ठेव. त्यांनी अलेक्सच्या केसाला धक्का लावला, तर लोकांना तें सहन होणार नाहीं. ॲलेक्स लोकांचा आवडता आहे. यापूर्वी ॲलक्सनं कुणावर हात तरी उगारला होता का ? बोल माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. "

" नाहीं. " जोसेफ म्हणाला.

" मग हेंच पहाना ! त्यांनी जरी अलेक्सच्या आंगाला हात लावला, तरी लोक चवताळून वेडे होतील—मी वेडी होईन. माझ्यानं तें सहन होणार नाहीं. ! "

" तूं काय करशील ? " जोसेफनं विचारलं.

" कां काय करशील म्हणजे ? मी स्वतः त्यांच्यापैकीं कांहींजणांना ठार करीन. " ॲनी म्हणाली.

" मग ते तुला गोळी घालतील. "

" खुशाल घालूं दे ! जोसेफ मी सांगतें-वातावरण भलतंच खवळेल. रात्रंदिवस लोकांना गोळया घालायच्या. "

जोसेफनं टेबलाच्या कडेला, खुर्ची लावली व कसा कुणास ठाऊक, चमत्कारीक रितीनं तो कटवाला बनला. " ॲनी, " त्यानं हलक्या आवाजांत हांक मारली.

ती थांबली व त्याच्या आवाजांतील हलकेपणा ध्यानांत घेऊन, त्याच्या जवळ गेली. त्यानं विचारलं " ॲनी तूं गुपित फोडणार नाहींस ? " तिनं त्याच्याकडे किंचित अभिमानानं पाहिलं, कारण आतां पावतों, जोसेफन तिला कधीं एकही गुप्त गाष्ट सांगितली नव्हती. " नाहीं फोडणार. काय आहे गुपित ? "

" वुइल्यम डील व वॉल्टर डॉगेल काल रात्रीं निसटले. "

" निसटले ! कुठं गेले ? "

" ते होडींतून इंग्लंडला गेले. "

ॲनीनं आनंदाचा व आशेचा सुस्कारा सोडला. " हें सगळं यांना ठाऊक आहे ? " तिनं विचारलं.

" सगळयांना नाहीं- " तो म्हणाला- " प्रत्येकाला ठाऊक आहे पण- " चटकन् छताकडे आंगठा करीत तो म्हणाला-" वरच्यांना ठाऊक नाहीं. "

" कधीं गेले ते ? मला कशी नाहीं कळली ही गोष्ट ? "

" तूं कामांत होतीस. " जोफेसचा आवाज नि चेहरा थडमार पडला. " " तुला तो कोरेल ठाऊक आहे ? "

" हो. " जोसेफ तिच्या अगदीं जवळ येऊन म्हणतो. " मला नाहीं वाटत तो फार दिवस जगेल. "

" म्हणजे ? " ॲनींनं आश्चर्यकारक मुद्रेनं प्रश्न केला.

" लोक कुजबुजत आहेत. " ॲनींन आनंदानं सुस्कारा सोडीत म्हटलं "अस्सं!" शेवटीं जोसेफला मतं हवी होतीं ती कळली." लोक एकवटत आहेत. आपल्याला शत्रूनं जिंकणं त्यांना आवडत नाहीं. आतां बऱ्याच घडामोडी होणार आहेत. ॲनी डोळ्यांत तेल घालून तयार रहा. तुला सुद्धां कामं करावी लागतील. "

ॲनीनं विचारलं " पण आपल्या मेयरचं काय ? तो काय करणार आहे ? त्याचा काय विचार आहे ? "

" कुणालाच ठाऊक नाहीं. " जोसेफ म्हणाला, " तो कांहीच बोलत नाहीं."

" तो आपल्या विरुद्ध असणं शक्य नाहीं. " ॲनी म्हणाली.

" तो कांहीच बोलत नाहीं- " जोसेफ म्हणाला.

डाव्या हाताचं दार उघडून, मेयर ऑर्डन सावकाश खोलींत आला तो वयातीत व म्लान दिसत होता. त्याच्या मागोमाग डॉक्टर विंटर आला. " ऑर्डन म्हणाला. " छान ! जोसेफ छान आहे ही व्यवस्था, थँकयू ॲनी. ठीक दिसतंय. "

ते बाहेर पडल्यावर, जोसेफनं दार बंद करण्यापूर्वी बाहेर डोकावून पाहिलं. मेयर आर्डन विस्तवाकडे पाठ वळवून शेक घेत उभा राहिला. डॉक्टर विंटरनं टेबलाच्या बाजूची खुर्ची ओढली व बसला. " आणखी किती दिवस मला असं राहतां येईल कुणास ठाऊक ? "

" लोकांचा माझ्यावर पुरा विश्वास नाहीं व शत्रूचाही नाहीं. ही गोष्ट चांगली कीं वाईट. कोण जाणें. "

" काय सांगणार ? " डॉक्टर विंटर म्हणाला. " तुझा स्वतःवर विश्वास आहे ना ? तुझ्या मनांत कसला संशय उत्पन्न झाला नाहीं ना ? "

" संशय ? छट्. मी मेयर आहे. मला पुष्कळशा गोष्टी समजत नाहींत. " तो टेबलाकडे बोट दाखवित म्हणाला. " ही चौकशी, इथं करायचं त्यांनी कां ठरविलं आहे कुणास ठाऊक ? खुनाच्या आरोपाखालीं ते इथं ॲलेक्झांवर मार्डनची चौकशी करणार आहेत. तुला ॲलेक्स आठवतो ना, त्याची ती लहानशी सुंदर बायको, मॉली ? "

" हं-आठवते तर. ती शाळेंत शिकवीत असे. हो मॉली, मला चांगली आठवते. ती इतकी सुंदर आहे दिसायला कीं डोळे अधू म्हणून चश्मा लावायचं तिच्या जिवावर आलं. मला वाटतं, ॲलेक्सनं एकाद्या अधिकाऱ्याला ठार केलं हें खरं आहे. त्याबद्दल कुणाला संशय नाहीं. "

मेयर ऑर्डन कडवट सुरांत म्हणाला. " कुणालाच संशय नाहीं. मग ते त्याची चौकशी कशाला करताहेत ? ते त्याला सरळ गोळी कां नाहीं घालीत ? ही, संशय खात्री, न्याय अन्यायाची बाब नव्हे. इथं असला कांहीं प्रकार नाहीं. त्यांना ॲलेक्सची चौकशीच करायची काय जरूर नि तीसुद्धां माझ्या घरात ? " डॉक्टर विंटरनं उत्तर दिलं. " मला वाटतं ही चौकशी म्हणजे नुसता देखावा आहे. पण त्याच्यामागं एक कल्पना आहे. चौकशी करण्याचा देखावा उभा केला, कीं कांहीं लोकांचं त्या नुसत्या देखाव्यानं चौकशी झाल्याचं समाधान होतं. कांहीं लोक नुसत्या वरवरच्या देखाव्यानं फसतात. असं पहा, कीं आपली फौज होती-शिपाई होते, बंदुका होत्या-पण ती खरी-खुरी फौज नव्हती, समजलं कीं नाहीं ? स्वारीवाले चौकशीचा फार्स करून, आपलं करणं न्याय्य आहे-असा, जनतेच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याचा प्रयत्न करतील. तुला ठाऊक आहे कीं, ॲलेक्सनं त्या कॅप्टनला ठार मारलं. "

" हों. तें मला समजलं. " मेयर म्हणाला.

विंटर पुढं बोलूं लागला. " लोक तुझ्या-मेयरच्या घरांत न्याय मिळण्याची अपेक्षा करतात-त्याच ठिकाणाहून जर या चौकशी नंतर, निकाल बाहेर पडला,—"

उजव्या बाजूचं दार एकदम उघडलं व त्यामुळं विंटरचं बोलणं तिथल्या तिथंच थांबलं तीस एक वयाची सुंदरशी तरुण बाई आत आली तिनं आपला चश्मा हातांत काढून घेतला होता. तिचा पोशाख साधा पण टापटिपीचा असून तिच्या तोंडावरून ती गोंधळलेल्या मनःस्थितींत आहे असं वाटत होतं. आंत येतांक्षणींच ती म्हणाली. " ॲनीनं मला सरळ आंत जायला सांगितलं. "

" वा: आंत ये कीं. मॉली मार्डन ना तूं ? मेयरनं विचारलं. "

" होय. असं म्हणतात कीं ॲलेक्सची चौकशी करून त्याला गोळी घालण्यांत येणार आहे. "

ऑर्डनची दृष्टि जमिनीवर खिळली होती. मॉली म्हणाली. " असं म्हणतात कीं, तुम्हीं त्याला शिक्षा ठोठावणार. तुमच्या शद्बावर त्याचे प्राण अवलंबून आहेत. "

आर्डननं दचकून वर पाहिलं. " आं ? हें काय ? मॉली कुणी सांगितलं हें तुला ? कोण म्हणतं मी शिक्षा देणार ? " त्यानं विचारलं.

" शहरांतील लोक म्हणतात. " ती सरळ उभी राहून, अर्धवट विनंती-वजा व अर्धवट दटावणीवजा आवाजांत प्रश्न विचारूं लागली. " कराल का असं तुम्ही ? नाहींना करणार असं तुम्ही ? कराल ? "

" मला जें कळत नाहीं तें लोकांना कसं समजतं ? " त्यानं विचारलं.

" तें मोठं गूढच आहे. " डॉ. विंटर म्हणाला. " लोकांना कसं समजतं, या गूढ प्रश्नानं जगांतल्या साऱ्या राज्यकर्त्यांना बेचैन केलंय्. मला असं कळलंय् , कीं सेन्सॉरमधून बातमी बाहेर फुटते यामुळं स्वारीवाले संत्रस्त झाले आहेत. नियंत्रण असूनसुद्धां सत्य कसं चव्हाट्यावर येतं, या प्रश्नानं स्वारी-वाल्यांची माथीं फिरलीं आहेत. हें मोठं कोडंच आहे. "

त्या मुलीनं मान वर केली; कारण खोलींत एकदम काळोख पसरला होता. ती घाबरलेली दिसत होती. " मळभ आलंय्. " ती म्हणाली " या वर्षी नेहमीपेक्षा लवकरच हिम पडायला लागलं आहे. " डॉक्टर विंटर खिडकिशीं जाऊन, किलकिल्या डोळ्यांनी आभाळाकडे पहात म्हणाला. " हं. मोठा ढग आलाय्. जाईल मला वाटतं लवकरच. "

मेयर ऑर्डननं दिवा लावला पण त्यामुळं छोटंसं तेजोवलय पडलं. " दिवसा दिवा लावणं उदासवाणं वाटतं, " असं म्हणून त्यानं दिवा मालवला.

मॉली पुनः त्याच्याजवळ आली. " अ‍ॅलेक्स खुनी नाहीं. " तिनं म्हटलं. " तो तापट डोक्याचा आहे हें जरी खरं असलं तरी त्यानं कधीं कायद्याचं उल्लंघन केलं नाहीं. त्याच्याबद्दल सर्वांना आदर वाटतो. "

ऑर्डन तिच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला. " अ‍ॅलेक्सला, तो लहानसा मुलगा होता तेव्हांपासून मी ओळखतों. माझी त्याच्या वडिलांशी व आजो-बाशी ओळख होती. त्याचे आजोबा, जुन्याकाळीं अस्वलाचे शिकारी म्हणून प्रसिद्ध होते, ठाऊक आहे तुला ? "

मॉलीनं त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून विचारलं, " पण तुम्ही ॲलेक्सला शिक्षा देणार नाहीं ना ? " मेयरनं उत्तर दिलं, " मी कसा त्याला शिक्षा देऊं शकेन ? "

" शहरांत शांतता राखण्यासाठीं, तुम्ही ॲलेक्सला शिक्षा द्याल, " असं लोक म्हणतात.

मेयर ऑर्डन खुर्चीमागें उभा राहिला असून खुर्चीची पाठ त्यानं हातानं घट्ट धरली होती.

" मॉली, लोकांना शांतता हवी आहे का ? "

" मला नाहीं ठाऊक. " तिनं उत्तर दिलं. " लोकांना स्वातंत्र्य हवं आहे. "

" पण स्वातंत्र्य कसं मिळवायचं हें त्यांना कळतं का ? सशस्त्र शत्रूविरुद्ध कोणत्या रितीनें लढायचं हें त्यांना माहीत आहे का ? "

" नाहीं. मला नाहीं वाटत, त्यांना ठाऊक असेल. " ॲनीनं उत्तर दिलं.

" मॉली, तूं मोठी चुणचुणीत नि चलाख मुलगी आहेस. तुला तरी ठाऊक आहे का ? "

" नाहीं. पण लोकांना असं वाटतं कीं ते जर नमून वागले तर त्यांच्या पाठींत दंडुका बसतो. त्यांच्या मनांतून या शिपायांना असं दाखवून द्यायचं आहे कीं पहा, अजूनसुद्धां आम्हीं आजिंक्य आहोंत. "

" त्याना लढायची संधीच मिळाली नाहीं. मशीनगनवर उडी घालणं म्हणजे कांहीं लढणं नव्हे. " डॉक्टर विंटर म्हणाला.

ऑर्डननं विचारलं. " मॉली, लोकांना काय करायचं हें कळलं, म्हणजे तूं मला येऊन सांगशील ? "

त्याच्याकडे संशयास्पद नजरेनं पहात ती म्हणाली. " हो. सांगेन. "

" तुला नाहीं म्हणायचं होतं असंच ना ? तुझा माझ्यावर विश्वास नाहीं ? "

" पण ॲलेक्सचं काय ? " तिनं विचारलं.

" मी त्याला शिक्षा देणार नाहीं. त्यानं आपल्या लोकांचा कांहीएक गुन्हा केलेला नाहीं. " मेयर म्हणाला

मॉली बुचकळयांत पडली. तिनं विचारलं, " ॲलेक्सला ते ठार मारतील ? "

ऑर्डन तिच्याकडे प्रेमपूर्ण दृष्टीनं पहात म्हणाला. " बाळ. "

तिचं सर्वांग शहारल्यासारखं झालं. " थॅंक यू. " ती एवढंच म्हणाली.

ऑर्डन जवळ आल्यावर, ती कष्टानं म्हणाली. " मला हात लावूं नका. हात नका लावूं मला. " त्याचा हात तसाच गळून पडला. क्षणमात्र ती तशीच उभी राहिली, नंतर चटकन वळून बाहेर पडली.

तिनं दार बंद केल नसेल तोंच जोसेफ आंत आला. " सर, कर्नलला आपली भेट घ्यायची आहे, ती इथं असल्याचं मला माहीत असल्यानं, मेयर कामांत आहेत. असं मी सांगितलं. मादामनांसुद्धां आपल्याला भेटायचंय्. "

" मादामला पाठवून दे आंत " मेयरनं सांगितलं.

जोसेफ बाहेर पडला नि लगेच मादाम आंत आली.

" घर कसं चालवायचं हेंच मला कळेनासं झालंय्. घरांत वाजवीपेक्षां फाजील माणसं झाली आहेत. ॲनी तर सारखी डोक्यांत राख घालून बसलीय्. "

" शुः शुः " मेयरनं इशारा दिला. मादामनं त्याच्याकडे आश्चर्यानं पाहिलं. " मला नाहीं माहीत काय— "

" शुः शुः " मेयर हळूच म्हणाला. " सारा, ॲलेक्स मॉर्डनच्या घरीं जा. समजलं ? मॉली जवळ जाऊन बस. अक्षर बोलूं नको, पण तिच्याजवळ जाऊन बस. कळलं ? "

मादाम म्हणाली. " माझी हजार कामं— "

" सारा, तूं मॉली मॉर्डनकडे जावं, अशी माझी इच्छा आहे. तिला एकटी सोडूं नको. जा चालायला लाग. "

आतां हळू हळू मादामच्या डोक्यांत प्रकाश पडायला लागला. " हं. जाते मी. बरं हें केव्हां संपणार ? "

" मला काय ठाऊक वेळ झाली कीं मी ॲनीला पाठवीन. "

तिनं हलकेच त्याच्या गालाचं चुंबन घेतलं व ती बाहेर पडली. ऑर्डन दारापाशीं जाऊन जोसेफला हांक मारून म्हणाला. " जोसेफ, आतां कर्नलला आंत पाठव. "

लॅन्सर आला. त्यांच्या आंगात कडकडीत इस्त्रीचा युनिफार्म असून कमरेवर सुंदरसा छोटा खंजीर लटकत होता " गुडमॉर्निंग; युवर एक्सलन्सी मला तुमच्याशीं कांही खाजगी बोलायचंय्! " असं म्हणून त्यानं डॉक्टर विंटरकडे कटाक्ष फेंकला. " मला तुमच्या एकट्याशींच कांही बोलायचंय्. "

डॉ. विंटर सावकाश उठून दारापाशीं गेला असेल नसेल तोंच ऑर्डननं हाक मारली. " डॉक्टर! " विंटरनं वळून विचारलं. " काय ? "

" आज संध्याकाळीं येणार का ? "

" कां ? कांही काम आहे माझ्यासाठीं ? "

" छे; काम नाहीं ! पण मला एकटंएकटं वाटतं, "

" अच्छा. येईन. "

" डॉक्टर, मॉलीची स्थिती कशी वाटली तुला ? "

" हं मला वाटतं तिला हिस्टेरियासारखं झालं आहे. पण ती कॅंडलीं कुळांतली असल्यानं मजबूत आहे. "

डॉ. विंटर बाहेर गेला व त्यानं सावकाश दार ओढून घेतलं.

लॅन्सर शांतपणं त्याची वाटच पहात होता. त्यानं दार बंद झालेलं पाहिलं; टेबलावरून व खुर्च्यांवरून दृष्टि फिरविली. " झाल्या प्रकाराबद्दल मला किती वाईट वाटत आहे म्हणून सांगूं ! हा प्रकार घडला नसता तर बरं झालं असतं. " कर्नल लॅन्सर म्हणाला.

मेयर ऑर्डननं किंचित् लवून त्याला अभिवादन केल्यासारखं केलं. लॅन्सर पुढं बोलूं लागला. " मला तुमचा स्वभाव आवडतो, मला तुमच्याबद्दल आदर आहे, पण मला कामगिरी पार पाडायची आहे. तुम्हाला माझी स्थिती खात्रीनं समजली असेलच. "

ऑर्डननं उत्तर दिलं नाहीं. त्याची दृष्टी लॅन्सरच्या डोळ्यांवर खिळली होती.

"आम्ही केवळ आमच्या स्वतःच्या विचारानुसार वागत नाहीं."लॅन्सर एकेक वाक्य बोलून मेयर कांहीतरी बोलेल या अपेक्षेनं थांबत होता, पण या बाबतींत मेयरनं त्याची निराशा केली. "आम्हांला राजधानींत पास झालेले कायदे पाळावे लागतात. या इसमानं एका अधिकाऱ्याला ठार मारलं आहे." सरतेशेवटीं ऑर्डननं उत्तर दाखल विचारलं, "मग तुम्ही त्याला गोळी कां नाहीं घातलीत ? गोळी घालण्याची तीच वेळ होती."

लॅन्सरनं मान हलविली. "समजा, मी तुमचं म्हणणं मान्य केलं, तरी कांहीं त्यात फारसा फरक पडत नाहीं. आपणा दोघानांही हें कळतं कीं, शिक्षा ही मुख्यत्वेंकरून संभवनीय गुन्हेगाराला रोखण्यासाठीं आहे. ज्या अर्थी, शिक्षा ही खुद्द गुन्हेगारांपेक्षां इतरांसाठीं असते, त्याअर्थी ती सर्व लोकांना समजेल अशा तऱ्हेनं दिली पाहिजे. तिचा गाजावाजा केला पाहिजे, इतकंच नव्हे तर, नाटकाप्रमाणं ती लोकाना दाखविली पाहिजे." लॅन्सरनं कंबरेच्या पट्टयांत हात घालून छोटा खंजीर हलविला.

मेयरनं वळून खिडकी बाहेर दिसणाऱ्या काळयाकुट्ट आकाशाकडे पहात म्हटलं, "आज रात्रीं बहुतेक हिम पडणार."

"मेयर ऑर्डन आमचे हुकूम कडक आहेत, आम्हांला कसंही करून कोळसा मिळालाच पाहिजे. जर तुमचे लोक शांततेनें वागत नसतील, तर आम्हाला, जबरदस्तीनं शांतता प्रस्थापित करावी लागेल." त्याचा आवाज कठोर बनला. "जरूर पडली तर आम्हांला लोकांवर गोळीबार केलाच पाहिजे. तुम्हांला जर आपल्या लोकाचे प्राण वांचवायचे असतील, तर शांतता प्रस्थापित करायला तुम्ही आम्हांला मदत केली पाहिजे. माझ्या सरकारचं असं मत आहे कीं, स्थानिक अधिकाऱ्यानंच शिक्षा द्यावी. त्यामुळं काम सुरळीत चालतं."

ऑर्डन शान्तपणं म्हणाला. "एकंदरीत लोकांना हें कळलं म्हणायचं. मोठं गूढ आहे–त्यांना कसं कळलं हें !" आवाज चढवून तो पुढं म्हणतो. "एथील चौकशीनंतर मी ॲलेक्झांडर मॉर्डनला शिक्षा ठोठावावी अशी का तुमची इच्छा आहे ?"

"होय तुम्ही जर हें केलंत, तर नंतर होणारा बराचसा रक्तपात टाळाल."

ऑर्डन टेबलाजवळ गेला व एक मोठी खुर्ची पुढं ओढून, प्रमुख जागीं बसला. एकदम असा भास झाला कीं, मेयर न्यायाधीश आहे व कर्नल लॅन्सर गुन्हेगार आहे. आपलीं बोटं टेबलावर वाजवीत तो बोलायला लागला. "तुम्हांला नि तुमच्या सरकारला कांहीं कळत नाहीं. प्रत्येकवेळीं जनतेचं मन जाणतां आलं नाहीं, म्हणून शतकानुशतकं पराभवावर पराभव खाणारं, असं अलम दुनियेंत एकच सरकार आहे. आणि तें म्हणजे तुमचं सरकार नि तुम्ही लोक," तो थांबला "हें तत्व कुचकामी ठरतं. पहिली गोष्ट म्हणजे मी मेयर आहे. मला देहांताची शिक्षा देण्याचा अधिकार नाहीं. या लोकांच्यात एकालाही तसा अधिकार नाहीं. तसं जर मी केलं, तर मी व तुम्ही दोघेही कायद्याचं उल्लंघन करूं."

"कायद्याचं उल्लंघन?" कर्नल म्हणाला.

"तुम्ही आलांत तेव्हां सहाजणांना ठार मारलंत. आमच्या कायद्याप्रमाणं तुम्ही सारे खुनी आहांत. कर्नल, तुम्ही या कायद्याच्या भानगडींत पडतां कशाला? तुमच्या आमच्यांत आतां कायदा शिल्लक राहिलेला नाहीं. हें युद्ध आहे. आम्हां सर्वांना तुम्हांला ठार मारावं लागेल, किंवा कालांतरानी आम्ही तुम्हां सर्वांना ठार मारूं. हें कसं तुम्हांला कळत नाहीं? तुम्ही येतांक्षणींच कायदा मोडलात व त्याच्या जागीं नवा कायदा आला, हें नाहीं तुम्हांला ठाऊक?"

लॅन्सरनं विचारलं. "मी खालीं बसूं का?"

"हें कशाला उगीच विचारतां? हें आणखी एक ढोंग आहे. तुमच्या मनांत आलं तर तुम्ही मला उभं रहायला लावाल"

लॅन्सर म्हणाला. "तुम्हांला पटो वा न पटो व्यक्तिशः मला तुमच्याबद्दल व तुमच्या स्थानाबद्दल आदर वाटतो आणि—" क्षणभर कपाळाला हात लावून तो पुढें बोलूं लागला.

"त्याचं असं पहा कीं, माझं वय नि मागील आठवणी, याला कांहीं फारसं महत्व नाहीं. कदाचित् मला तुमचं म्हणणं पटेल, मी तुमच्याशीं

सहमत होईन. पण त्यामुळं कांहींच बदलणार नाहीं. ज्या लष्करी नि राजकीय पद्धतींत मी काम करीत आहे, तिच्यांत अशा कांहीं प्रवृत्ति नि वहिवाटी, परंपरा आहेत, कीं त्या बदलणं अशक्य आहे. ''

आर्डन म्हणाला. '' त्या चाली नि प्रवृत्ति चूक आहे, हें जगाच्या आरंभापासून प्रत्येक वेळीं सिद्ध झालं आहे. ''

लॅन्सर कटुहास्य करीत म्हणाला. '' मी अनुभवानें वृद्ध झालों आहे. त्यामुळं एकवेळ मला तुमचं म्हणणं मान्य होईल. इतकंच नव्हे तर मला असं सुचवावंसं वाटत कीं, मागील अनुभवांवरून कांहींहि धडा न घेणं, हीच लष्करी मनोवृत्तिची व राजकीय पद्धतीची, एक प्रवृत्ति आहे; मानवांची हत्या करणं हेंच आपलं कार्य आहे, असं तिला वाटतं, व हत्येपलीकडे दृष्टी फेंकण्यास ती असमर्थ आहे. ठार मारण्यापलीकडे दुसरं कांहीं असेल, असं तिला वाटणं शक्य नाहीं. पण मी मागील आठवणी काढून विरघळणारा मनुष्य नव्हे. त्या खाणकामगाराला सर्व लोकांसमोर जाहीरपणें गोळी घातली पाहिजे. कारण त्यांतल तत्व असं आहे, कीं इतरजण आमच्या लोकांना ठार मारायला तयार होणार नाहींत. ''

ऑर्डन म्हणाला: '' आतां या विषयीं आणखी कांही बोलायची जरूरी नाहीं. ''

'' आपण बोललंच पाहिजे. आम्हांला तुमची मदत हवी आहे. ''

ऑर्डन कांहीं वेळ तसाच स्तब्ध राहून म्हणाला. '' मी काय करणार आहे, तें सांगतों तुम्हांला. आमच्या शिपायांना ठार मारण्यांत आलं, त्यावेळीं कितीजण मशीन-गन्सवर होते ? '' '' मला वाटतं विसापेक्षां अधिक नसतील ? '' लॅन्सरनं उत्तर दिलं.

'' अच्छा ! त्यांना जर तुम्ही शिक्षा देणार असाल, तर मी मॉर्डनला शिक्षा देईन ''

'' चेष्टेनं बोलत नाहीं ना तुम्ही ? ''

'' सीरीयस्ली, बोलतां तुम्हीं ? ''

'' हो-मी सीरीयस्लीच बोलत आहे. ''

" तुम्हांला माहीत आहे–असं होणं शक्य नाहीं. "

" तें मला ठाऊक आहे. " ऑर्डन म्हणाला, " आणि तुम्हीं म्हणतां तें सुद्धां होणं शक्य नाहीं. "

लॅन्सर म्हणाला. " मला वाटतंच होतं. शेवटीं कोरेललाच मेयर व्हावं लागेल. " लगेच वर दृष्टी फिरवून त्यानं विचारलं. " तुम्हीं चौकशीच्या वेळीं थांबणार ना ? "

" हो. मी थांबेन, मी असलों म्हणजे ॲलेक्सला इतकं उदास वाटणार नाहीं. " लॅन्सरनं त्याच्याकडे पाहून खिन्नपणं स्मित केलं. " आपण जबाब-दारीच घेतली आहे आपल्यावर असं नाहीं का ! "

" हूं " मेयर म्हणाला. " जगांतल्या अशक्य कोटींतील जबाबदारी घेतलीय्. ती जबाबदारी पुरी पाडणं अशक्य आहे. "

" ती कोणती ! "

" माणसाचा, कायमचा तेजोभंग करणं. "

ऑर्डनचं डोकं खालीं वांकलं. वर न पाहतां तो तसाच बोलूं लागला. " हिम पडायला लागलंय्. अजून रात्रही झाली नाहीं. मला हिमाचा, मधुर, शीतल सुगंध मनापासून आवडतो. "

---

# प्रकरण ४ थें.

अकराच्या सुमारास हिम जोरानं पडायला लागून आकाश दिसेनासं झालं हिमवर्षाव चालू असतांना लोक कसेबसे घाईघाईनं जात होते; उंबरठ्यावर हिम सांचलं; सार्वजनिक चौकांतील पुतळ्यांवरसुद्धां हिम सांचलं. खाणीपासून बंदरापर्यंत जाणाऱ्या रुळांवर हिम पडलं होतं हिमामुळें हातगाड्या घारख्या घसरत होत्या. शहरावर मेघांहून दाट असा अंधकार पसरला होता. शुष्क, वाढत्या द्वेषांचं नि चिरडीचं वातावरण शहरांत भिनलं होतं. लोक फार वेळ रस्त्यांत उभे रहात नसत; ते चटकन घरांत शिरून दार बंद करीत, खिडक्यांच्या पडद्यांतून कुणीतरी पहात असा भास होई; रस्त्यांतून पहारेकरी शिपाई गेले, कीं त्यांच्यावर, क्रूर द्वेषपूर्ण नजर रोखली जाई, लोक दुकानांतून जाऊन वस्तु खरेदी करीत, पण दुकानदारांशीं नमस्कार चमत्कार सुद्धां करीत नसत.

छोट्या राजवाड्याच्या दिवाणखान्यांत, दिवे लावले होते. प्रकाश किरण खिडकीवाटे बाहेर पडून हिमसरींवर चमचमत होते. कोर्टाचं काम चालू होतं. लॅन्सर टेबलापाशीं प्रमुख जागीं बसला होता. त्याच्या उजव्या हाताला हंटर, टॉडर बसले होते. कॅप्टन लॉफ्ट अगदीं टोंकाला बसला असून त्याच्यापुढं कागदांचा ढीग पडला होता. त्यांच्या समोर टेबलाच्या दुसऱ्या बाजूला मेयर ऑर्डेन, कर्नलच्या डाव्या हाताला बसला होता. प्रॅकल त्याच्या जवळच असून पॅडवर कांहींतरी खरडीत होता. टेबलाच्या कडेला दोन संगीनधारी पहारेकरी उभे होते. त्यांच्या डोक्यांत हेल्मेट असून ते छोट्या लांकडी चित्रांसारखे दिसत होते. त्यांच्या मध्यें ॲलेक्स मॉर्डन उभा होता. ॲलेक्स उंचापुरा उमदा तरुण होता. त्याचा भालप्रदेश उतरता असून, डोळे खोल व गंभीर होते, त्याचं नाक लांब व तरतरीत दिसे; त्याची हनुवटी निश्चयी स्वभाव दर्शवीत असून, जिवणी रुंद व कामुक होती. त्याचे खांदे मजबूत व रुंद असून

पृष्ठभाग निरुंद होता त्याच्या बेड्या घातलेल्या हातांची एकसारखी घरसोड चालू होती. अंगात उघडया कॉलरचा निळा शर्ट, त्यावर जुना झालेला कोट व खालीं निळी विजार, अशा पोशाखांत ॲलेक्स बेडयांनी जखडलेले हात, एकांत एक अडकवून धरी व सोडून देई.

कॅप्टन लॉफ्ट आपल्या पुढं असलेल्या कागदावरून वाचूं लागला. " ज्या वेळस ॲलेक्सला, पुनः कामावर जाण्याचा हुकूम दिला, त्यावेळीं त्यानं काम करण्याचं नाकारलं, जेव्हां पुनः हुकूम देण्यांत आला, तेव्हां कैद्यानं हातातील पिकावान कॅप्टन लॉफटवर हल्ला केला. कॅप्टन बेंटिक मध्यें पडला."

मेयर ऑर्डन खोकला. कॅप्टन लॉफटचं वाचून झाल्यावर तो ॲलेक्सला म्हणाला. " खालीं बस ॲलेक्स. पहारेकरी, खुर्ची आण पाहूं एक, " पहारेकऱ्यानं मुकाट्यानं खुर्ची पुढं ओढली.

" कैद्यानं उभं रहायचं अशी पद्धत आहे. " लॉफ्ट म्हणाला.

" खालीं बसूं द्या त्याला. " मेयर म्हणाला. " फक्त आम्हांलाच तो बसला होता. हें कळेल. तुम्हीं रिपोर्ट करा, " कैदी उभा होता " म्हणून. "

" खोटे रिपोर्ट करायची पद्धत नाहीं. " कॅप्टन लॉफ्ट म्हणाला.

" खालीं बस ॲलेक्स. " ऑर्डन पुनः म्हणाला. तो उमदा तरुण खालीं बसला. बेड्या असलेल्या त्याच्या हातांची, मांडीवर चळवळ चालू होती. लॉफटनं वाचायला सुरुवात केली. " हें सर्व "

कर्नल म्हणाला. " त्याला बसूं द्या. "

कॅप्टन लॉफ्टे घसा साफ करून वाचूं लागला. " कॅप्टन बेंटिक मध्यें पडला. त्याच्या डोक्यावर फटका बसला व त्याचा चेंदामेंदा झाला. सोबत डॉक्टरचा रिपोर्ट जोडला आहे. तो मी वाचून दाखवूं का डॉक्टरचा रिपोर्ट! "

" कांहीं जरूरी नाहीं. " कर्नल म्हणाला. " शक्य तितकं लवकर आटपा. " प्रत्यक्ष घडलेल्या या साऱ्या गोष्टी, आमच्या कित्येक शिपायांनी स्वतः डोळयांनी पाहिल्या आहेत; त्यांच्या साक्षी सोबत जोडल्या आहेत. या लष्करी कोर्टाला असं आढळून आलं की, कैद्यावरील खुनाचा आरोप शाबीत झाला आहे व त्याबद्दल तें कैद्यास देहाताची शिक्षा सुनावीत आहे. शिपायांच्या लेखी साक्षी वाचूं ?"

लॅन्सर सुस्कारा सोडीत म्हणाला. " नको. " तो ॲलेक्सकडे वळून म्हणाला. " ॲलेक्स, कॅप्टनला ठार मारल्याचं तूं नाकारीत नाहींस ना ? "

ॲलेक्स खिन्नपणं हंसला. " मी त्याला फटका मारला. मी त्याला ठार मारलं हें मला माहीत नाहीं. "

ऑर्डन उद्गारला. " शाबास ॲलेक्स. छान काम केलंस ! " ते दोघे एकमेकांकडे मित्रभावानं पाहूं लागले.

लॉफ्टनं विचारलं " दुसऱ्या कुणीतरी त्याला ठार मारलं असं तुला म्हणायचंय् काय ? " " मला ठाऊक नाहीं. " ॲलेक्स म्हणाला. " मी त्याला फक्त फटका मारला नंतर मला कुणीतरी मारलं. "

" तुला कांहीं आणखी सांगायचं आहे कोर्टाला ? कांहीं सांगितलंस तरी शिक्षा बदलेल असं नाहीं मला वाटत. पण आम्हीं ऐकून घ्यायला तयार आहों. "

लगेच लॉफ्ट म्हणतो. " कर्नल, आपण हें बोलला नसतात, तर फार चांगलं झालं असतं. याचा अर्थ असा होतो कीं कोर्ट निःपक्षपाती नाहीं. "

ऑर्डन उगाचच वरच्यावर हंसला. कर्नलनं त्याच्याकडे पाहून स्मित केलं. " तुला कांहीं सांगायचं आहे का ? " त्यानं पुन्हा विचारलं.

लॉफ्टकडे बोट दाखवून ॲलेक्स म्हणतो. " त्याला-त्याला माझ्या मनांतून मारायचं होतं. मी बेभान झालों होतों. माझा स्वभाव तापट आहे. त्यानं सांगितलं " काम केलंच पाहिजे. " मी स्वतंत्र माणूस आहे. मी संतापलों नि त्याला फटका लगावला. मला वाटतं फटका जोरांत बसला असला पाहिजे. मी चुकून भलत्यालाच मारलं. "

ॲलेक्सनं हात वर करण्यासाठीं उचलला, पण बेडी असल्यामुळं दुसरा हात आपोआपच वर उचलला गेला. त्याला कसचंसं वाटलं व त्यानं हात पूर्ववत मांडीवर ठेवला.

लॅन्सर म्हणाला. " तुझ्या मनांतून कुणाला मारायचं होतं या सांगण्याचा कांहीं उपयोग नाहीं. कुणालाही तें तसंच लागलं असतं. बरं या कृत्याबद्दल तुला वाईट वाटतं का ? " तो टेबलाकडे वळून म्हणतो. " कशाला वाईट वाटलं, असं रेकॉर्डांत बरं दिसेल. "

" वाईट वाटतं ? " ॲलेक्सनं विचारलं. " मला वाईट वाटत नाहीं. त्यानं, मला एका स्वतंत्र माणसाला " काम कर " म्हणून सांगितलं. एकेकाळीं मी म्युनिसिपालिटीचा सभासद होतों. तो म्हणाला. " मी कामं केलं पाहिजे. "

" पण जर तुला देहान्त शिक्षा दिली, तर तुला वाईट वाटणार नाहीं ? " ॲलेक्सनं मान खालीं घातली व तो प्रामाणिकपणं विचार करण्याचा प्रयत्न करूं लागला.

" नाहीं. " तो निर्धारानं म्हणाला. " तुम्हांला असं म्हणायचंय् कीं मी पुनः असं करीन का ? " " हं. तेंच. " " नाहीं. " ॲलेक्स विचारपूर्वक म्हणाला. " मला नाहीं वाईट वाटत. "

लॅन्सर म्हणाला. " अच्छा, रेकॉर्डमध्यें लिहा. कैद्याला अतिशय पश्चाताप झाला होता. शिक्षा ही होणारच समजलं ? कोर्टाला मागं पाउल घेतां येत नाहीं. कोर्टाला तुला दोषी ठरविलं असून तावडतोब गोळी घालण्याची शिक्षा फर्मावली आहे. तुला आणखी छळण्यांत कांहीं अर्थ आहे असं मला वाटत नाहीं; कॅप्टन लॉफ्ट विसरलंय का कांहीं सांगायचं ? "

" तुम्हीं मला विसरलांत. " ऑर्डन म्हणाला. तो खुर्ची मागं सारून उभा राहिला व ॲलेक्सपाशीं जाऊन उभा राहिला. ॲलेक्स नेहमीच्या संवई प्रमाणं त्याचा मान राखण्यासाठीं उठून उभा राहिला. " ॲलेक्झांडर, मी लोकांनी निवडून दिलेला मेयर आहे. "

" तें मला ठाऊक आहे. "

" ॲलेक्स, या माणसांनीं आपल्या देशावर स्वारी केली आहे. त्यांनी आपला देश, फितुरी व जबरदस्तीच्या जोरावर अचानकपणं हल्ला करून, घेतला आहे. "

कॅप्टन लॉफ्ट म्हणाला. " सर, हें बोलूं देतां कामां नये. "

लॅन्सर म्हणाला. " चूप ! हे मोठ्यानं बोलतांना ऐकलेलं चांगलं, कीं कुजबुजलेलं चांगलं ? "

आपल्याला बोलतांना कुणाचा प्रतिबंध झाला नाहीं. अशा तऱ्हेने ऑर्डन बोलत होता, " ते आले तेव्हां लोक गोंधळून गेले होते नि मी गोंधळलों होतों. काय करायचं किंवा कसला विचार करायचा हें आपल्याला

समजलं नाहीं. ॲलेक्स तूं मात्र पहिल्याप्रथम स्पष्ट कृती करून दाखवलीस तुझा वैयक्तिक क्रोध हा जनतेच्या क्रोधाचा उगम ठरला. मी यांना जाऊन मिळालों आहें, त्यांना सामिल होऊन काम करीत आहे, असं शहरांतील लोक माझ्याबद्दल म्हणत आहेत, हें मला ठाऊक आहे. मी काय करतों आहे, हें शहराला दाखवूं शकेन-पण तूं मृत्युच्या दारांत उभा आहेस. पण हें तुला समजावं असं मला वाटतं."

ॲलेक्सनं मान खालीं टाकली; डोकं वर करून तो म्हणाला. "मला ठाऊक आहे." लॅन्सरनं विचारलं. "शिपायांची तुकडी तयार आहे का ?"

"बाहेर आहे." "कमांडिंग ऑफिसर कोण आहे ?"

"लेफ्टनंट टॉडर, सर." टॉडरनं डोकं वर केलं, क्षणमात्र तो श्वास घ्यायचा थांबला. ऑर्डननं मृदु आवाजात विचारलं. "ॲलेक्स तूं घाबरला आहेस ?"

ॲलेक्स म्हणाला-" होय."

"घाबरूं नको, असं मी तुला सांगू शकत नाहीं. मीसुद्धां घाबरेन आणि हे तरुण शूरवीरसुद्धां घाबरतील."

लॅन्सरनं हुकूम सोडला. "तुकडीला बोलवा." ताबडतोब टॉडर उठला व दारापाशीं जाऊन म्हणाला. "इथ आहेत ते." त्यानं सताड दार उघडलं. बाहेर हेल्मेट घातलेले शिपाई दिसत होते.

ऑर्डन म्हणाला. "ॲलेक्स तूं जा. ध्यानांत ठेव, कीं-हे लोक येथून चालते होईपर्यंत किंवा मरेपर्यंत, त्यांना आम्हीं क्षणाचीही विश्रांती लाभूं देणार नाहीं. तुझ्या उदाहरणामुळं जनतेंत प्रचंड एकजूट तयार होईल. ही साधी गोष्ट कळायला, आम्हांला जबर किंमत द्यायला लागली हे खरं, व आम्हीं तुझं ऋण पुरं फेडलं नाहीं हें पण खरं-पण ध्यानांत ठेव-त्यांना आम्हीं सळो का पळो करून सोडूं. त्यांना एकतर ठार मारूं किंवा हांकलून देऊं."

ॲलेक्सनं डोळे घट्ट मिटून घेतले. मेयरनं त्याला जवळ ओढून त्याच्या गालाचं चुंबन घेतलं. "गुडबाय् ॲलेक्स." तो म्हणाला.

गार्डनं ॲलेक्सचा दंड धरून बाहेर नेलं. ॲलेक्सनं डोळे मिटून धरले होते. तुकडीनं तोंड फिरविलं व चालूं लागली. त्यांच्या पावलांचा आवाज बर्फांत दबून गेला.

टेबलापाशीं बसलेले सारेजण स्तब्ध होते. ऑर्डनचं लक्ष खिडकी गेलं. चटकन् कुणीतरी तावदानावरील बर्फ पुसून काढलं, पुसलेला भाग वाटोळा दिसत होता. तो तिकडे मोठ्या आश्चर्यानं पहात होता, पण त्यानं चटकन् दुसरीकडे नजर फिरवली. तो कर्नलला म्हणाला. " आपण काय करीत आहांत याची जाणीव तुम्हांला असलच. "

कॅप्टन लॉफ्टनं कागद गोळा केले. लॅन्सरनं त्याला विचारलं. " कॅप्टन चौकांत कां गोळी घालणार त्याला ? " " हो चौकांत. शिक्षा सर्व लोकांसमोर झाली पाहिजे. " लॉफ्ट म्हणाला.

ऑर्डन म्हणाला. " आपण काय करतों हें तुम्हांला कळत असेलच. "

कर्नलनं उत्तर दिलं. "आम्हांला कळो वा न कळो, तें झालंच पाहिजे."

खोलींत शांतता पसरली. प्रत्येकजण ऐकण्यासाठीं आतुर झाला होता, पण कुणाला फार वेळ थांबायला लागलं नाहीं. लांबून बंदुकींची फैर झडल्याचा आवाज आला. लॅन्सरनं दीर्घ सुस्कारा सोडला. ऑर्डननं कपाळाला हात लावला व दीर्घश्वास घेतला. नंतर बाहेर ओरडा झाला. खळकन् तावदानाची कांच फुटून आंत पडली. त्यानं हात वर उचलला व त्याच्याकडे डोळे फाडून पाहूं लागला.

लॅन्सर उडी मारून ओरडला. " हं म्हणजे सुरवात झाली म्हणायची! फार लागलं लेफ्टनंट ! "

" खांद्याला, " प्रॅकल म्हणाला.

लॅन्सरनं हुकूम फर्मावला. " कॅप्टन, बाहेर बर्फात पावलं उमटलीं असतील. बंदुकीसाठीं प्रत्येक घराचा झाडा घ्यायला पाहिजे. ज्याच्यापाशीं बंदुक सांपडेल त्याला ओलीस ठेवला पाहिजे. आणि मेयर, तुम्हांला प्रोटेक्टीव्ह कस्टडींत ( संरक्षक नजरबंदीत ) ठेवण्यांत आलं आहे. याद राखा एका शिपायासाठीं, आम्हीं पांच, दहा, शंभरजणांना गोळ्या घालूं. "

ऑर्डन शांतपणं म्हणाला—'कांहीं जुन्या आठवणीं असलेले आहांत तुम्हीं.'

लॅन्सर हुकूम फर्मावितांना मध्येंच थांबला, क्षणमात्रच त्यानं मेयरकडे पाहिलें व दोघांनींही एकमेकाचं मनोगत जाणलं. लॅन्सर छाती पुढं काढून राहिला. " मला कसलीही आठवण नाहीं !" तो निरसलपणं म्हणाला.

" शहरांतील हत्यार अन् हत्यार गोळा केलं पाहिजे. जो कोणी हरकत घेईल त्याला पकडून आणा. चला जा. त्यांची पावलं बुजलीं नाहीं, तोंच कामाला लागा. "

स्टाफच्या शिपायांनी हेल्मेट घातलीं, पिस्तुलं घेतलीं व बाहेर पडले. ऑर्डन फुटक्या खिडकीपाशीं जाऊन खिन्नपणं म्हणाला. " हिमाचा मधुर नि शीतल सुगंध ! "

दिवसांमागून दिवस, आठवड्यामागून आठवडे कंटाळवाणेपणानं जात होते. बर्फ पडे वितळे—नि शेवटीं सांचून राहिलं. त्या लहानशा शहरांतील काळ्या इमारतींवरून पांढरंशुभ्र बर्फ सांचलं होतं, व बर्फांतून दारापर्यंत जाणारे खंदक, खणले होते. बंदरांत बोटी रिकाम्या होऊन येत व जातांना कोळशानं भरून जात. पण खाणींतून कोळसा मात्र तितक्या सहजासहजीं बाहेर निघत नव्हता. वाकबगार कामगार चुका करूं लागले. ते कामाची हेळसांड करून काम थंडावूं लागले. यंत्रं मोडायला लागलीं व लवकर दुरुस्त होईनात. त्यास देशांतील जनता शांतपणं, सूड उगविण्याची वाट पहात बसली. देशद्रोही लोक, ज्यांनीं स्वारीवाल्यांना मदत केली त्यांना असं आढळलं कीं लोक आपल्याकडे द्वेषपूर्ण दृष्टिनं बघतात व आपल्याशीं बोलायला कुणी तयार नाहीं. स्वारीवाल्यांना मदत केल्यानं, आपली परिस्थिती सुधारेल, व आदर्श जीवन लाभेल, असं वाटणाऱ्या देशद्रोह्यांना हें कळून चुकलं कीं स्वारी-वाल्यांचा ताबा व नियंत्रण ढिलं आहे.

शहरच्या वातावरणांत मृत्यु संचारून चाहूल घेत होता. हें शहर देशाच्या इतर भागाला रेल्वेनं जोडलं होतं. रेल्वेचा रस्ता डोंगरावरून गेला होता. रेल्वे लाईनवर अपघात होऊं लागले. हिमनद्या रेल्वे लाईनवर कोसळून, लाईन नादुरुस्त होऊं लागली. आधीं लाईनची तपासणी झाल्या-वांचून एकही गाडी सुटेनाशी झाली. लोकांवर दहशत बसविण्यासाठीं, गोळ्या घालण्यांत आल्या पण व्यर्थ. अधूनमधून तरुणांचा एखादा गट इंग्लंडला निसटून जाई. इंग्लिशांनीं कोळशाच्या खाणीवर बॉंबफेक करून नुकसान केलं व आपल्या कांहीं दोस्तांना व शत्रूंना ठार केलं. याचा कांहीं

उपयोग झाला नाहीं. जनतेच्या मनांत दबलेला द्वेष, हिंवाळ्यावरोबर वाढतच गेला. अन्नाच्या पुरवठ्यावर नियंत्रण घालण्यांत आलं आज्ञाधारक लोकांना धान्य देण्यांत येई; बंडखोरांना खायला अन्न मिळेना, साहजिकच सारे लोक आंतल्याआंत द्वेषाग्निनं जळत आज्ञाधारक बनले. पण अशी वेळ आली कीं, लोकांना अन्न देणं जरूर पडलं; कारण उपाशी माणूस कोळसा कसा काढणार, ओझीं कशी उचलून नेणार ! वरवर लोक जरी शांत होते तरी त्यांच्या नजरेंत द्वेषाग्निची प्रखर आग दडली होती.

आतां अशी परिस्थिती झाली कीं जेताच पुरा घेरला गेला. बॅटलियन-मधील शिपाई शत्रू बनून राहिले. क्षणभरसुद्धां पहारा ढिला करायला कुणी तयार न्हहता. पहारा जरा कुठं ढिला झालारे झाला कीं, तो शिपाई नाहींसा होऊन त्याचं प्रेत कुठं तरी बर्फांत फेकलं गेलंच समजा. एकादा शिपाई एकटाच कुणा बाईकडे गेला कीं तो नाहींसा होऊन त्याचं प्रेत बर्फांत पडायचं. एकादा शिपाई दारु पिऊन झिंगला कीं तो नाहींसा झालाच. आतां बॅटलियनचे शिपाई एकएकटे गाऊं नाचूं शकत नव्हते-सगळे मिळून गायचे किंवा नाचायचे, पण आता नाच हळूहळू कमी व्हायला लागले, व गाण्यांतसुद्धां त्यांना घरीं जाण्याची लागलेली तळमळ व्यक्त व्हायला लागली. शिपाई आपसांत बोलत ते सुद्धां आपल्या नातेवाईक किंवा प्रेमळ मित्रांविषयीं; त्यांना प्रेमाचा व आनंदाचा प्यास लागला होता. कारण माणूस शिपाई झाला म्हणून काय झालं ? दिवसांतून फार तर अमुक तास, व वर्षांतून अमुक महिने माणूस शिपाई असतो. पुनः त्याला माणूस व्हावंसं वाटतंच. त्याला दारु प्यावीशी वाटते, संगीत ऐकावंसं वाटतं, हंसावसं वाटतं, स्त्रीसहवास लागते-विसांवा हवासा वाटतो-आणि हें मिळेनासं झालं-कीं या मिळविण्याच्या आकांक्षा प्रबळ होतात.

शिपायांना राहून राहून घराची आठवण येई. हळूहळू बॅटलियन मधील शिपायांना जिंकलेल्या शहराचा तिरस्कार वाटूं लागला; ते लोकांशी तुटक रितीनं वागूं लागले-लोकांनींसुद्धां तोच मार्ग स्वीकारला. हळूहळू जेत्यांच्या मनांत भीति डोकावूं लागली. त्यांना अशी धास्ती पडली कीं, हें

असंच चालायचं; आपल्याला घरीं जायला मिळणार नाहीं. एके दिवशीं आपलं सामर्थ्य तडकून जाणार व नंतर हे लोक सशांप्रमाणं आपल्याला दऱ्यांखोऱ्यांतून हुसकून काढतील, कारण जनतेच्या मनांतील द्वेषाचा पारा चढतच होता. पहारा करणाऱ्या शिपायांना कुठं उजेड दिसला, हंसण्या-खिदळण्याचा आवाज ऐकूं आला, कीं ते एकदम आकर्षिले जात—पण ते जवळ यायचा अवकाश कीं, हंसणं खिदळणं ताबडतोब थांबे, आनंद हवेंतल्या हवेंत विरून जाई व लोक पुन: थंडपणं आशाधारक बनत. शिपा-यांना हॉटेलवरून जातांना खमंग वास आला कीं ते तडक आंत शिरून, जेवण मागवायचे पण पाहतात तों भाजींत मीठच जास्त घातलेलं किंवा तिखटजाळ करून ठेवलेली.

शिपाई इतर जिंकलेल्या देशांची व किंवा घरची बातमी वाचायचे, आणि बातमीसुद्धां नेहमींच इतकी चांगली असायची, कीं पहिल्या पहिल्यानं, त्यांचा तिच्यावर विश्वास बसे, पण पुढं पुढं तोही बसेनासा झाला. प्रत्येकाच्या अंत:करणांत धास्ती दबा धरून बसली होती. "घरीं कांही गडबड उडाली किंवा सगळंच ढासळलं, तरी आपल्याला बातमी कळविणार नि मग आपला नाइलाज होईल. आपली शंभर वर्षे भरलींच समजा. हे लोक आपल्याला जिवंत सोडणार नाहींत, सगळ्यांची वाट लावतील." बेल्जम व रशियांतून माघार घेणाऱ्या आपल्या शिपायांची काय गत झाली, याची त्यांना आठवण झाली. त्यांच्यांपैकीं ज्यांना लिहिण्या-वाचण्याची विशेष आवड होती. त्यांना मॉस्कोहून घेतलेल्या माघारीची आठवण झाली. काय ती त्रेधातिरपीट, नि कावरे बावरे पणानं, जीव मुठींत घेऊन केलेली शोकपूर्ण माघार ! त्यावेळीं प्रत्येक रशियन शेतकऱ्याने यांच्या शिपायांना रक्त-बंबाळ केलं होतं व त्यांच्या शिपायांचे मुडदे जागोजागीं बर्फांत कुजत पडले होते.

आपलं सामर्थ्य जर खचलं, मगरमिठी जर सैल झाली, किंवा आपण फार वेळ डाराडूर झोंपत पडलों तर इथं आपली तीच गत होणार. म्हणून त्यांना रात्रीं शांत झोंप लागायची नाहीं, व दिवसभर ते बेचैन व्हायचे.

शिपाई आपल्या अधिकाऱ्यांना प्रश्न विचारायचे. पण अधिकारी काय कपाळ उत्तर देणार ? काय उत्तर द्यायचं हें त्यांचं त्यांनाच माहीत नव्हतं, कीं कुणी त्यांना सांगितलं नव्हतं. घरून येणाऱ्या रिपोर्टांवर त्यांचा सुद्धां विश्वास नव्हता.

जेते, जिंकलेल्या जनतेला घाबरूं लागले; त्यांनीं जनतेची धास्ती घेतल्यानं त्यांचं धाबं दणाणलं. त्यांच्यांत घबराट पसरून, रात्रीच्यावेळीं ते भयाभीत होऊन सांवलीवर सुद्धां गोळया झाडूं लागले. शिवाय ते कुणाशीं बोलायचे नाहीं. त्यांच्या मुद्रेवर नेहमीं रागीटपणा दिसे. एका आठवड्यांत शिपायांना वेड लागलं, दिवस रात्र ते रडत ओरडत होते; शेवटीं त्यांची घरीं रवानगी करण्यांत आली. इतर शिपायांना सुद्धां वेड लागलं असतं. पण त्यांना अशी बातमी लागली कीं अशा वेड लागलेल्या शिपायांपुढं घरीं गेल्यावर, मृत्युचं ताट वाढून ठेवलंल आहे, व दया दाखविण्यासाठींच ठार मारण्याच्या, या कल्पनेनेंच त्यांना धडकी भरली. रहात्या जागेंत धास्तीनं हाय घेऊन ते दुःखी झाले; पहारेकऱ्यांना कांपरं भरून ते क्रूर बनले.

दिवस लहान होऊन रात्री मोठ्या होऊं लागल्या. दुपारीं तीन वाजतांच काळाकुट्ट अंधार पडे नि सकाळीं नवाला उजाडे. शहरांत कुठं उजेड दिसेना, कारण बॉंबर्सच्या भीतिनं खिडक्यांना काळं फांसण्याचा क्रायदा जारी करण्यांत आला होता. इतकं होतं तरी आकाशांत इंग्लिश विमानं घरघरायला लागलीं कीं कोळशाच्या खाणीजवळ हटकून प्रकाश दिसायचा, एकदां संत्री पहारेकऱ्यांनी कंदील घेऊन जाणाऱ्या एका माणसाला गोळी घातलीं; एकदां बॅटरीनं खुणा करणाऱ्या मुलीला गोळी घातली. पण त्याचा कांही एक परिणाम झाला नाही. गोळया फुकट गेल्या. सामान्य शिपायांच्या भावनाचंच, अधिकाऱ्यांच्या मुद्रेवर कमी अधिक प्रमाणांत प्रतिबिंब उमटलेलं दिसे. कमी अधिक म्हणण्याचं कारण असं कीं, ते अधिकारी असल्यामुळं त्याचं शिक्षण अधिक पुरं झालं होतं; त्यांच्यावर मोठी जबाबदारी असल्यानं भावना लपविण्यासाठीं ते अनेक युक्त्या प्रयुक्त्या योजीत, पण शिपायांना वाटणारी भीति त्यांच्या मनांत होती; शिपायांना लागलेली तळमळ त्यांच्या अंतःकरणांत खोल दडून बसली होती. शिवाय अधिकाऱ्यांची अवस्था

कैचींत सांपडल्यासारखी झाली होती; कारण लोक त्यांच्या हातून कुठं चूक घडते हें पहाण्यासाठीं डोळयांत तेल घालून टपून बसले होते, तर त्यांच्या हाताखालचे शिपाई, आपल्या अधिकाऱ्याच्या वागणुकींत ढिलेपणा किंवा कमजोरी आढळते कीं काय इकडे डोळे लावून बसले होते. त्यामुळं अधिकारी तर या दुहेरी ताणामुळं अगदीं जेरीस आले होते. अशारितीनं जेत्यांभोंवतीं प्रचंड नैतिक वेढा पडला होता. जेत्यांच्या सामर्थ्याला पहिला तडा गेला कीं काय होईल, हें जेते आणि जिंकलेली जनता दोघेही पुरे समजून होते.

मेयरच्या राजवाड्यांतील वरच्या मजल्यावर आनंद दिसत नव्हता. खिडक्यांवर काळा कागद घट्ट चिकटविला होता. खोलींत, गॅसमास्क, चश्मे, हेल्मेट-लावून ठेवले होते, कारण हें सामान मोठं महत्वाचं होतं ना ? खोलींत शिस्त जरा ढिली झालेली दिसत होती. अधिकाऱ्यांनासुद्धां असं वाटलं कीं शिस्तीचीं बंधनं जर अधिक घट्ट केलीं, तर ( लष्करी ) यंत्रच मोडून पडायचं. टेबलावर पेट्रोलचे दोन कदील असून, प्रखर प्रकाशांत त्यांच्या मोठ्या छाया भिंतीवर पडल्या होत्या व दिवे जळत असल्यानं हिसस्स् असा आवाज खोलींत पसरला होता.

मेजर हंटर आपल्या कामांत दंग होता. त्याला सारखं ड्रॉईंगबोर्ड घेऊन बसावं लागे, कारण ड्रॉइंग पुरं झालं रे झालं, बॉम्बमुळं तें फाटून जाई. पण यामुळं मेजर हंटरला मुळींच वाईट वाटलेलं दिसत नव्हतं, नकाशे तयार करणं, हा त्याचा मोठा आवडीचा नाद. आणि इथं तर त्याला नकाशे तयार करण्याचं काम इतकं मिळालं होतं कीं काम त्याला पुरून उरलं असतं. त्याच्या मागं दिवा असून, हातांत ड्रॉइंगबोर्ड होता; हातांतील बोर्डावर टी-स्क्वेअर खालींवर सरकविला जाई, व पेन्सिल झरझर फिरूं लागे.

टेबलापाशीं, लेफ्टनंट प्रॅकल सचित्र मासिक वाचीत होता. त्याचा हात अजून बँडेजमध्यें अडकविलेला होता. टेबलाच्या दुसऱ्या टोंकाला बसून लेफ्टनंट टॉंडर पत्र लिहीत होता. मधून-मधून शब्द आठवण्यासाठीं तो छतावर दृष्टी लावी.

प्रॅकल पत्राचं पान उलटीत म्हणाला. " मी डोळे मिटून या रस्त्यावरचं दुकान न् दुकान बघूं शकतों. " हंटरचं काम चालू होतं-टॉंडरनं आणखी

थोडे शद्ब लिहिले. प्रॅकल पुढं बोलूं लागला. " हें पहा, याच्यामागं रेस्टॉरंट आहे. चित्रांतसुद्धां तें दिसतंय्. " बर्डेन्स रेस्टोरंट " त्याचं नांव. "

हंटर मान वर न करतां ह्मणाला:-" मला ठाऊक आहे तें हॉटेल. स्कलप्स ( कालवांचं पक्वान्न ) फार छान मिळतात तिथं. "

" छान मिळत होतीं–त्या हॉटेलांतला प्रत्येक पदार्थ रुचकर असायचा–तिथली कॉफी—"

टॉडर पत्रावरून नजर वर उचलून म्हणाला, " आतां स्कलप्स नि कॉफी मिळणार नाहीं त्या हॉटेलांत. "

प्रॅकल म्हणाला. " ते मला कांहीं सांगतां येत नाहीं. मागं तिथं मिळे, पुन्हां मिळायला लागेल. तिथं एक मुलगी होती, पदार्थ आणून द्यायला. बॅंडेजमध्यें न बांधलेल्या हातांनी त्या मुलीचा बांधा दर्शवीत तो म्हणतो. " अगदीं गुलाबासारखी गोरी होती. " " त्यानं हातांतील मासिकाकडे पाहिलं. " तिचे डोळे मोठे चमत्कारिक होते, म्हणजे आहेत. नेहमीं ओलावलेले दिसत. जणूं काय इतक्यांतच ती हंसत किंवा रडत होती. " छताकडे नजर फेंकून तो हलक्या आवाजांत बोलूं लागला. एकदां मी तिच्याबरोबर गेलों होतो. फारच सुंदर होती ती पोरगी. पुन्हां मी तिच्याकडे कां गेलों नाहीं. कुणास ठाऊक असेल की नाहीं ती तिथं अजून ? "

टॉडर निराशामय सुरांत म्हणाला. " नसेल बहुतेक, कदाचित फॅक्टरींत काम करीत असेल. " प्रॅकल हंसून म्हणतो. " मला वाटतं घरीं ( जर्मनींत ) अजून मुलींचं रेशनिंग सुरू झालं नसेल. " " कां ? " टॉडरनं विचारलं.

प्रॅकल मिस्किलपणं म्हणतो. " तुला मुलींच्याबद्दल कांहीं विशेष वाटत नाहीं. वाटत नाहीं ना ? निदान फारसं वाटत नाहीं. "

टॉडर म्हणाला. " पोरी म्हणून मला आवडतात. त्यांचा उपयोगँ एवढंच मी जाणतों. जीवनांतील इतर गोष्टीआड, मी त्यांना येऊं देत नाहीं. "

प्रॅकल टोमणा मारून म्हणतो. " मला वाटते त्या एकसारख्या तुझ्या भंवती भोंवतीं बिळखत असतात. "

टॉडरनं विषय बदलण्याचा प्रयत्न केला. " मला या भिकारड्या कंदिलांचा अस्सा राग येतो. मेजर, तो डायनॅमो कधीं बसविणार ? "

मेजर हंटर बोर्डवरून सावकाश नजर फिरवीत ह्मणाला. " वास्तविक आतांपर्यंत तें काम व्हायला पाहिजे होतं. मी चांगलीं माणसं कामाला लावलीं आहेत. मला वाटतं यापुढं डायनॅमोवरचा पहारा वाढविला पाहिजे ".

" डायनॅमोची मोडतोड करणारा माणूस सांपडला का ? " प्रॅंकलनं विचारलं.

हंटर उग्रपणं ह्मणाला. " मी पांचही जणांना पकडलं आहे. त्यांच्यापैकीं एकानें मोडतोड केली अस्ली पाहिजे. " मनांतल्या मनांत विचार करीत तो ह्मणाला. " डायनॅमोची धुळदाण उडविणं इतकं सोपं काम आहे, पण तें कसं करायचं हें मात्र माहीत असलं पाहिजें. थोडं " शॉर्ट सर्क्युट, " करायचं कीं, आपोआपच डायनॅमोचे बारा वाजतात. आतां इतक्यांत दिवे लागायला पाहिजेत. "

प्रॅंकलची नजर मासिकावर खिळली होती. " आपली केव्हां सुटका होईल कोण जाणे ! घरीं जाऊन विश्रांति केव्हां मिळेल असं झालंय. "

हंटरनें मान वर करून पाहिलं. क्षणमात्र त्याच्या तोंडावर निराशा पसरलेली दिसली. " हं बरोबर आहे. " लगेच तो सावध होऊन बोलूं लागला. " चार वेळां मी हें सायडिंग बांधून काढलं. दर वेळीं याच सायडिंगवर बॉंब पडून तें कसं मोडून पडतं कुणास कळे. ह्याच रेलरोड पुन्हां पुन्हां तयार करायचा मला अगदीं कंटाळा आलाय्. बॉंब पडल्यानं वाटेंत मोठमोठाले खड्डे पडले आहेत, ते चुकवून मला रस्ता तयार करावा लागतो. कारण ते खड्डे भरून काढायला वेळ कुठं आहे ! जमीन गोठून दगडासारखी टणक झालीय्. भयंकरच काम आहे हें. "

इतक्यांत एकदम दिवे लागले, त्यासरशीं टॉडरनं पेट्रोलचे कंदील विझवले. लगेच कंदीलांचा हिस्स्स–आवाज थांबला.

टॉडर ह्मणतो. " दिवे आले ह्मणून बरं झालं ! त्या आवाजानं माझं डोकं फिरायची वेळ आली होती. तो आवाज ऐकला कीं कुणीतरी कुजबुजत

आहे असं असा मला भास व्हायचा. " लिहीत असलेल्या पत्राची घडी करून तो ह्मणाला. " आश्चर्य आहे मोठं ! अलीकडे पत्रंच येत नाहींत. गेल्या पंधरवड्यांत मला अवघं एकच पत्र आलं. "

प्रॅकल म्हणाला. " कदाचित् तुला कुणी पत्र लिहींतच नसेल. "

" तसंही असेल कदाचित्. " त्यानं मेजरला विचारलं. " घरची वाईट बातमी, समजा कुणी मेल्याची वगैरे ते कळवतील का आपल्याला ?"

" मला नाहीं ठाऊक. " हंटरनं उत्तर दिलं.

" या त्रांगड्यांतून सुटलों तर बरं होईल. " टॅंडर म्हणाला.

प्रॅकल म्हणतो. " मला तर वाटलं कीं लढाई नंतर तूं इथंच राहणार म्हणून. " टॅंडरच्या बोलण्याची नक्कल करीत तो म्हणाला. " चार पांच शेतं एकत्र करायची; छान इस्टेट होईल नाहीं कां ? इथला एक छोटासा जमीनदार होईन. इथले लोक फार चांगले आहेत. इथं हिरवीगार मैदानं आहेत, हरणं आहेत, छोटीं छोटीं मुलं आहेत, टॅंडर, असंच तूं म्हणायचास नाहीं का ? "

प्रॅकल बोलत असतांच टॅंडरचा हात गळल्यासारखा झाला. त्यानं दोन्ही हातांनी कपाळ दाबून धरलं. व भावनेच्या भरांत उदगारला. " चूप रहा ! असं कांही बडबडूं नको ! हे लोक ! हे भयंकर लोक ! हे तुसडे हे तुमच्याकडे ढुंकूनसुद्धां पहात नाहीं. " बोलतां बोलतां तो थरथर कांपूं लागला. " ते चकार शद्ब बोलत नाहींत. प्रश्न विचारला कीं मढ्याप्रमाणं उत्तर देतात. भयंकर लोक आहेत हे तुमचा हुकूम पाळतात बस्स ! इथल्या पोरींची शरीरं तर पार गारठून गेलीं आहेत. "

इतक्यांत दारावर हलकेच टिचकी वाजली, व जोसेफ कोळशाचा डबा घेऊन आंत आला. आंत आल्यानंतर त्यानं थोडाही आवाज न करतां डबा खालीं ठेवला व तोंड वळवून मुकाट्यानं बाहेर जाण्यासाठीं दाराजवळ गेला. प्रॅकलनं ओरडून हांक मारली. " जोसेफ ! " जोसेफ अक्षर न बोलतां वळला व किंचित् वांकला. प्रॅकलनं दरडावून विचारलं. " जोसेफ, घरांत ब्रँडी, वाईन कांहीं आहे कीं नाहीं ! " जोसेफनं मान हलविली. टॅंडर ताडकन

उठला. रागानं त्याचं तोंड लालबुंद झालं होतं. तो किंचाळला " ए सुव्वर उत्तर दे ! बोल ! " जोसेफनं वर न पहातांच यांत्रिकपणं उत्तर दिलं " नाहीं ! घरांत वाईन नाहीं ! "

टॉडरनं चवताळून विचारलं. " आणि ब्रँडीही नाहीं ? " निश्चल उभं राहून त्याच आवाजांत जोसेफ ह्मणाला. " नाहीं. ब्रँडी नाहीं ! "

टॉडरनं विचारलं. " तुला काय हवंय ? "

जोसेफ ह्मणाला. " कांहीं नको ! मला जायचंय्. "

" चालता हो ! " जोसेफ मुकाट्यानं बाहेर पडला. टॉडरनं खिशांतून रुमाल काढून कपाळावरचा घाम पुसला. हंटरनं त्याच्याकडे पहात म्हटलं त्यानं तुला इतकं सहजासहजीं निरुत्तर केलं. तूं इतक्या सहजासहजीं त्याला आपला पराभव करूं द्यायला नको होतास. "

टॉडर मटकन् खुर्चीत बसला. कपाळाला हात लावून, तो बोलूं लागला " मला पोरगी हवी आहे. मला घरीं जायचंय्. या शहरांत एक सुंदर पोरगी आहे. तिचे सोनेरी केंस इतके सुंदर आहेत ! त्या जुन्यापुराण्या लोखंडी सामानाच्या दुकानाजवळ ती रहाते. मला ती पोरगी हवी आहे. "

प्रॅकलनं इशारा दिला. " टॉडर सावध हो. भलतं बडबडूं नकोस ! "

इतक्यांत खोलींतले दिवे गेले व सगळीकडे काळोख झाला. कुणीतरी काडी ओढून कंदील लावीत होतं इतक्यांत हंटर बोलूं लागला. " मला वाटलं सगळेजण सांपडले म्हणून. पण एकजण निसटला असला पाहिजे. पण एकसारखं डॉयनॅमोकडे उठल्यासुठल्या धांवायला मला वेळ नाहीं. मी तिथं चांगलीं माणसं ठेवून आलोंय्. "

टॉडरनं प्रथम एक कंदील लावला व नंतर दुसरा लावला—तों मेजर हंटर त्याला करड्या स्वरांत म्हणतो— " लेफ्टनंट, तुला बोलावंसंच वाटत असेल तर आमच्याशीं बोल. पण तुझं हें बोलणं शत्रूच्या कानीं जाणार नाहीं याची खबरदारी घे. "

टॉडर खालीं बसला, त्याच्या तोंडावर प्रकाशकिरण पडले असून खोलींत कंदिल जळत असल्यानं हिस्सस् असा आवाज पसरला होता. तो उद्गारला.

" हं बरोबर ! तेंच ! बघावं तिथं शत्रू ! प्रत्येक पुरुष, प्रत्येक स्त्री, फार कशाला प्रत्येक मूल शत्रू ! इथून तिथून सगळीकडे वैरी ! त्यांची तोंडं दारांतून डोकावतांना दिसतात. पडद्याआडून शत्रू कानोसा घेतो. आम्ही त्यांचा पराभव केलाय्, सगळीकडे आमची फत्ते झालीय्-हे लोक आमच्या हुकुमाची वाट पहातात नि पाळतात-वाट पहातात लेकाचे ! अर्धं जग आमच्या ताब्यांत आहे. इतरत्र असंच आहे काय मेजर ? "

हंटरनं मला माहित नाहीं एवढंच उत्तर दिलं.

" हेंच तें. " टॉंडर बोलूं लागला. " आम्हांला माहीत नाहीं-आम्हांला ठाऊक नाहीं. रिपोर्टस्-सगळं-कांही आमच्या हातांत आहे. जिंकलेल्या देशांतील लोक आमच्या शिपायांवरून आरती ओंवाळतात, नव्या व्यवस्थेचं स्वागत करतात. " त्याचा आवाज घोगरा झाला. " बरं आपले रिपोर्टस् काय आहेत ? आपलं स्वागत झालं, आपल्यावर लोकांनी फुलं उधळलीं असं आहे कां त्यांत ! बर्फांत दबा धरून बसलेले काय भयंकर लोक आहेत हे ! "

हंटरनं विचारलं. " तुझ्या मनांतलं सारं ओकून टाकलंस. आतां तुला तुला बरं वाटतंय् ना ? "

प्रॅकल टेबलावर मुठीनं ठेका धरीत होता. तो म्हणाला. " टॉंडरनं असं बोलायला नको होतं. त्यानं अशा गोष्टी आंतल्याआंत ठेवायच्या. टॉंडर शिपाई आहे ना ? मग त्यानं शिपायासारखं वागलं पाहिजे. "

दार हलकेच उघडलं. कॅप्टन लॉफ्ट आंत आला. त्याच्या शिरस्त्राणावर व खांद्यावर बर्फ पडलं होत. त्याच्या नाकाचा शेंडा लाल झाला असून, त्यानं ओव्हरकोटची कॉलर कानापर्यंत दुमडली होती. त्यानं शिरस्त्राण काढलं. बर्फ खालीं पडलं. " काय कठीण काम आहे ! " खांद्यावरील बर्फ झटकतां झटकतां तो म्हणाला. " आणखी कांही गडबड ? " हंटरनं विचारलं.

" गडबड सारखीच चालू आहे. पुन्हां तुझ्या डायनॅमोवर त्यांनी धाड घातलीय्. माझ्या खाणींतील गडबड तात्पुरती तरी थांबवली आहे मी. "

" तुझ्या इथं काय गडबड झाली ? " हंटरनं प्रश्न केला.

" नेहमीचीच गडबड—कामांत खोळंबा-आणि गाड्यांची मोडतोड; यावेळेस तो मोडतोड करणारा मला दिसला. मी त्याच्यावर गोळी झाडली. या मोडतोडीवर, मेजर मला एक तोडगा सुचलाय्. प्रत्येकानं कोळसा किती काढायचा हें मी ठरवीन व तेवढा त्याला काढायला लावीन. मला कामगारांची उपासमार करतां येणार नाहीं. कारण उपासमार व्हायला लागली तर त्यांना काम करतां येणं शक्य नाहीं. पण याच्यावर मला उपाय खरोखरच सुचलाय्. कोळसा निघाला नाहीं तर कुटुंबाला अन्न मिळणार नाहीं. आपण खाणीवरच कामगारांची जेवणाची सोय करूं म्हणजे ते घरीं जाऊन अन्नाची वांटणी करणार नाहींत. यामुळं ही गडबड थांबेल. कामगारांना काम केलंच पाहिजे, नाहींपेक्षां त्यांची पोरंबाळं उपाशी तडफडतील. आतांच मी त्यांना ताकीद दिली आहे. "

" मग ते काय म्हणाले ? "

खुनशीपणानं डोळे किलकिले करीत लॉफ्ट म्हणतो: " काय म्हणाले ? ते कधीं काय म्हणतात ? कांही नाहीं ! ते कांहीच बोलले नाहीं ! पण आतां कोळसा निघतो कीं नाहीं तें दिसेल. " असं म्हणत त्यानं कोट काढून झाडला, तों त्याचं लक्ष दाराकडे गेलं. दाराची फट उघडी दिसत होती. हळूच पुढं होऊन, त्यानं एकदम दार उघडलं व लगेच लावून घेतलं. मला वाटतं मी मघां दार घट्ट बंद करून घेतलं होतं. "

" हो, तूं दार बंद केलं होतंस. " हंटर म्हणाला.

प्रॅकल अजून हातांतील सचित्र मासिकाचीं पानं उलटीत होता. आतां त्याचा स्वर नेहमीं सारखा झाला होता. " आपण पूर्व आघाडीवर जंगी तोफा वापरीत आहों. मी अजून त्यांतली एकही तोफ पाहिली नाही. कॅप्टन तुम्ही पाहिली आहे का ? "

" हो तर " कॅप्टन लॉफ्ट म्हणाला. " मी त्या उडवितांना पाहिल्या आहेत. फारच आश्चर्यकारक आहेत पहा ! त्यांच्या भडिमारापुढं कशाचाही पाडाव लागणार नाहीं. "

टॉडरनं विचारलं. " कॅप्टन, तुम्हांला घरनं विशेष बातमी मिळते का ?"

" मिळते थोडीशी. " " घरीं सगळं ठाकठीक आहे ? "

" वा: ! ठाकठीक काय, उत्कृष्ट आहे ! आपल्या फौजा सगळीकडे आगेकूच करीत आहेत. "

" ब्रिटिशांचा अजून नाहीं पराभव झाला ? "

" प्रत्येक चकमकींत आपण त्यांना पाणी पाजलंय्. "

" पण अजून ते लढताहेत ? "

" थोडे हवाई हल्ले करताहेत बस्स. बाकी विशेष कांहीं नाहीं. "

" आणि रशियन्स ? "

" ते सगळे संपले. "

टॉडर जोर देऊन म्हणाला. " पण ते अजून लढताहेत ? "

" हं-थोड्या चकमकी उडताहेत. बाकी कांहीं नाहीं. "

" म्हणजे जवळजवळ आपण युद्ध जिंकलंच म्हणायचं, असंच नव्हे का, कॅप्टन ? "

" हो. आपण जिंकलंय्. "

टॉडर त्याच्याकडे निरखून पहात म्हणतो. " याच्यावर तुमचा विश्वास बसतो कॅप्टन ? "

प्रॅकल मध्येंच म्हणतो: " पुन: त्याला बरळूं देऊं नका. "

लॉफ्ट टॉडरकडे चिडून पहात, विचारतो. " तुझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच, कीं लौकरच आपल्याला घरीं जायला मिळेल, नाहीं का ? "

" पुनर्व्यवस्थेला कांहीं काळ लागेल. एका दिवसांत कांहीं नवी व्यवस्था सुरू करतां येणार नाहीं. " हंटर म्हणाला. टॉडर म्हणाला " कदाचित् आपल्या हयातभर देखील. "

प्रॅकल म्हणाला. " पहा, त्याला पुन: बरळूं देऊं नका ! "

लॉफ्ट टॉडरच्या अगदीं जवळ बेऊन म्हणाला. " लेफ्टनंट, तुझ्या प्रश्नाचा सूर मला पसंत नाहीं. संशयाचा सूर मला खपत नाहीं. " हंटर बर

मान करून म्हणाला. " लॉफ्ट, कशाला त्याच्यावर उखडतां ? तो कंटाळलाय्. आपण सगळेजणच कंटाळलों आहोत. "

" मीसुद्धां कंटाळलों आहे, पण मी असे देशद्रोही संशय मनांत येऊं देत नाहीं. "

हंटर म्हणाला. " सांगितलंना त्याला छळूं नका म्हणून ? कर्नल कुठंय्, ठाऊक आहे ? "

" कर्नल रिपोर्ट तयार करताहेत. ते आणखी शिपायांची रसद मागवीत आहेत. आपल्याला वाटलं त्यापेक्षां हें काम बिकट दिसतंय्. "

प्रॅकलनं औत्सुक्यानं विचारलं. " पण रसद मिळेल का ? "

" तें मी कसं सांगूं ? "

टॉडरच्या तोंडावर स्मित झळकलं. " रसद ! " तो हलक्या स्वरांत पुटपुटला. " रसद नसेल, इथल्या शिपायांची जागा भरून काढायला शिपाई हवे असतील. कदाचित् आपल्याला घरीं जायला मिळेल. " तो हंसत हंसत पुढं बोलूं लागला. " कदाचित मी घरीं जाऊन, रस्त्यांतून चाललों असतां, लोक म्हणतील, " तो पहा शिपाई चाललाय्. " त्यांना आनंद होईल. मी भेटल्यानं त्यांना आनंद होईल माझ्या आसपास मित्र गोळा झालेले असतील. व निर्भयपणं मी कुणाकडेही पाठ फिरवूं शकेन "

प्रॅकलनं दटावलं, " पुन: तेंच तेंच बडबडूं नको ? पुन: त्याला असा बेताल होऊं देऊं नका ! "

लॉफ्ट वीट आल्यागत म्हणाला. " आम्हांला भरपूर त्रास देतोय्. स्टाफला वेड लागण्याची कांही जरूर नाहीं. "

पण टॉडर बडबडतच होता. त्यानं विचारलं " पण कॅप्टन खरोखरच का नवे शिपाई येतील ? "

" येतील असं नाहीं मी म्हटलं. "

" पण येतील कदाचित्, असं म्हणालात तुम्ही. "

" मी म्हटलं, मला माहीत नाहीं. हें पहा लेप्टनंट, आपण अर्धे गाव जिंकलय. आपल्याला तिथं कांही दिवस पहारा केला पाहिजे समजलं ? "

" अर्धं जग जिकलं, पण बाकीचं अर्ध ? " टॉंडरनं प्रश्न केला.

" तें निराशेनें लढेल कांही दिवस. " लॉफ्टनं उत्तर दिलं.

" मग आपण सगळीकडे पसरलंच पाहिजे. "

" कांही काळ. " लॉफ्ट म्हणाला.

प्रॅकल नर्व्हस होऊन म्हणाला. " त्याला तोंड बंद करायला लावा ! त्याला म्हणावं बंद कर ही बडबड. "

टॉंडरनं रुमाल काढून नाक शिंकरलं, व माथेफिरूसारखा बडबडूं लागला. विनाकारण तो हंसूं लागला. तो बडबडायला लागला. " मला एक मजेदार स्वप्न पडलं. मला वाटतं तें स्वप्नच होतं. तें कदाचित् स्वप्न असेल किंवा विचारही असेल. "

प्रॅकल उद्गारला. " कॅप्टन त्याला चूप करा. "

टॉंडरनं विचारलं, " कॅप्टन हें शहर जिंकलंय् आपण ? "

" अर्थात्. " लॉफ्टनं उत्तर दिलं.

टॉंडरच्या हंसण्यांत वेडाची लहर चमकली. तो बोलूं लागला. " शहर जिंकलंय्, आणि आपण घाबरलों आहोंत. शहर जिंकलंय् आणि आपण वेढलों गेलों आहोंत. " तो कर्कशपणं हंसूं लागला. " मला स्वप्न पडलं किंवा मनांत विचार आला—बर्फातील त्या काळ्या सांवल्या; दाराआडील व पडद्यामागं दडलेले ते चेहरे—मला स्वप्न पडलं किंवा मनांत विचार आला. "

प्रॅकल म्हणाला. " त्याचं तोंड आंवरा ! "

टॉंडर म्हणाला. " आपला पुढारी ( हिटलर ) वेडा आहे असं मला स्वप्न पडलं. "

लॉफ्ट नि हंटर दोघेही एकदम हंसले. " किती वेडा आहे हे शत्रूला समजलंय्. मला हे घरीं कळविलं पाहिजे. वर्तमानपत्रांत हें छापतील. पुढारी किती वेडा आहे हें शत्रूला समजलंय्. "

टॉंडर हंसतच होता. " स्वारी वर स्वारी करून आपण चिखलांत खोल खोल रुतत चाललों आहोंत. " हंसून हंसून तो गुदमरला व रुमाल तोंडाशी धरून खोकूं लागला. " खरंही असेल कदाचित. पुढारी वेडा आहे.

माशा ( त्यांना पकडायला ठेवलेला ) चिकट कागद जिंकतात, माशांनीं नवा दोनशें मैल चिकट कागद ताब्यांत घेतला ! " त्यांच्या हंसण्यातील वेडेपणाची लहर चढतच होती.

ग्रॅकलनं त्याचा गदगदां हालवून म्हटलं. " चूप ! तोंड आवर ! तुला अधिकार नाहीं, असं बोलायचा ! "

टॉडरचं हंसणं वेडसरपणाचं आहे हें हळूहळू लॉफ्टच्या लक्षांत आलं. त्यांनं पुढं होऊन टॉडरच्या चपराक लगावली व म्हणाला. " लेफ्टनंट. थांबव पाहूं ? "

टॉडर हंसतच होता, लॉफ्टनं पुनः एक चपराक लगावली व दरडावून म्हणाला " लेफ्टनं तोंड आवर ? ऐकूं आलं का ? "

एकाएकीं टॉडर हंसायचा थांबला. खोलींत जळणाऱ्या कंदिलाखेरीज दुसरा कसलाच आवाज येत नव्हता. टॉडरनं चकित होऊन हाताकडे पाहिलं, तोंड चोळलं, पुन्हा हाताकडं पाहिलं व टेबलापाशीं जाऊन बसला. तो म्हणाला. " मला घरीं जायचंय. "

# ६

शहराच्या चौकालगत एक लहानसा रस्ता असून, रस्त्यावर लहान लहान घरांची व दुकानांची नुसती गर्दी उडाली होती. रस्त्यावरील बर्फ रह-दारीमुळं दबलं होतं; कुंपणांवरून व छपरांवरून सगळीकडे बरंच बर्फ सांचलं होतं. छोट्या घरांच्या बंद खिडक्यांवरसुद्धां बर्फ दिसत होतं. घराच्या पुढील व मागील अंगणांतील बर्फ बाजूला सारून वाटा केल्या होत्या. रात्रीं कडा-क्याची थंडी असून सर्वत्र काळोखच काळोख पसरला होता. बॉबर्स विमानांचं लक्ष वेधून घेण्यासाठीं कुठंही उजेड दिसत नव्हता. कर्फ्यु ऑर्डर जारी अस-ल्यानं रस्त्यांत कुणी फिरकत नव्हतं. बर्फांत घरं काळयाकुट ढिगांसारखीं दिसत होतीं. मधून मधून सहाजणांची तुकडी गस्त घाली प्रत्येकाच्या हातांत लांब बॅटरी असे व ते चोहोंबाजूस निरखून पहात. दूरवर विलीन होणारा त्यांच्या बुटांचा आवाज व घट्ट बर्फावर त्यांच्या बुटांची करकर ऐकूं येई. त्यांच्या आंगावर जाडजूड कोट लपेटून घेतलेले असत; डोक्यावर, कान, तोंड, गाल, हनुवटी झांकणाऱ्या लोंकरी कानटोप्या असून त्यावर पोलादी हेल्मेट असे. बर्फाची झिमझिम चालू होती.

पहारा करणारे शिपाई गस्त घालतां घालतां बोलत असत. त्यांच्या मनांतील गोष्टी, आकांक्षा अशावेळीं बाहेर पडत. त्यांना मांस, सूप, लोणी,

सुंदर मुली, त्यांचे स्मितहास्य नेत्र, ओठ–सर्व कांहीं हवं होतं नेहमी ते याच विषयी बोलत, कधींकधीं, आपल्याला करायला लागलेल्या कामाबद्दलचा, एकलकोंडेपणाचा संताप त्यांच्या बोलण्यांत व्यक्त होई.

लोखंडी सामानाच्या दुकानापाशीं एक छोटसं घर होतं. इतर घरासारखं याचं निमुळतं छप्पर असून तें बर्फानं आच्छादलेलं होतं. या घराचीं खिडक्या दारं अगदीं घट्ट बंद असून बाहेर प्रकाशाचा किरण सुद्धां डोकावत नव्हता. पण आंत एका लहानशा खोलींत दिवा जळत होता, बेडरूमचं व स्वयंपाक घराचं दार उघडं होतं. भिंतीजवळ लोखंडी स्टोव्ह असून त्यांत विस्तव होता. खोली छोटी असली तरी उबदार होती. जमिनीवर आंथरलेला गालिचा जुनाट दिसत होता. भिंतीवर, सोनेरी फुलं असलेला तपकिरी कागद लावलेला होता. मागच्या भिंतीवर, हिरव्या गवतांत मासा मरून पडला आहे, व फरवृक्षाच्या फांदीवर पक्षी मेलेला आहे, अशीं दोन चित्रं होतीं. उजव्या हाताच्या भिंतीवर हताश झालेल्या कोळयांकडे, ख्रिस्त समुद्रावरून चालत येत आहे, असं चित्र होतं खोलींत दोन खुर्च्या असून, एका कोचावर रंगीत ब्लॅंकेट घातलेलं होतं. खोलीच्या मधोमध छोटसं वाटोळं टेबल असून, दिव्याचा मंद प्रकाश खोलीभर पसरला होता. स्टोव्हच्या जवळ आंत जाण्याचं दार होतं.

मऊगादी असलेल्या जुन्या डोलखुर्चीवर मॉली मॉर्डन एकटीच बसली होती. तिच्या हातांत निळा स्वेटर असून, त्याची लोंकर उलगडून ती एका चेंडूला गुंडाळीत होती. लोंकर गुंडाळून गुंडाळून चेंडूचा आकार भला मोठा झाला होता. टेबलावरसुद्धां अडकविलेलं विणकाम असून जवळ एक मोठी कात्री पडली होती. विणतांना ती चश्मा लावीत नसल्यानं तो टेबलावर होता. मॉली, तरुण, सुंदर व नीटनेटकी होती. तिनं आपल्या सोनेरी केंस डोक्यावर बांधले असून त्यांत निळी फीत दिसत होती. ती भराभर उसवीत होती. मधून मधून तिची नजर दाराकडे वळे. वारा सूंसूं आवाज करीत होता, पण त्या व्यतिरिक्त बर्फाच्छादित रात्रीं कसलाच आवाज कानीं पडत नंव्हता. सर्वत्र सामसूम पसरली होती.

एकदम मॉलीनं काम थांबविलं. तिचे हात जागच्याजागीं थबकले. ती दाराकडे नजर फिरवून कानोसा घेऊं लागली. रस्त्यांतून पहारेकरी गस्त घालीत असून त्यांच्या बोलण्याचा अस्पष्ट आवाज आंत ऐकूं येत होता. त्यांच्या बोलण्याचा आवाज येईनासा झाला. मॉलीनं लोंकर काढली व ती चेंडूवर गुंडाळायला लागली. पुनः ती थबकली दाराशीं काहीं तरी सळसळ-ल्याचा आवाज झाला व नंतर तीन टिचक्या वाजल्या. मॉलीनं हातांतलं काम खालीं ठेवलं व दार उघडायला गेली. " थांबा ! " ती म्हणाली.

तिनं दार उघडलं व सर्वांग लपेटून घेतलेली आकृति आंत शिरली. ती आकृति म्हणजे दुसरं कुणी नसून, मफलर गुंडाळलेली, लालडोळ्यांची, स्वयंपाकीण ॲनी होती. ती इतक्या सफाईनं आंत आली की अशारितीनं आंत यण्याचा तिला सराव असावा असा वाटलं येताक्षणीं तिनं दार ओढून बंद केलं, व सभोंवार नजर फेकली.

मॉली म्हणाली. "ॲनी, आज रात्री तूं येशील अशी मला कल्पना नव्हती. कपडे काढ आंगावरचे आणि जरा शेक घे पाहूं. बाहेर थंडी मी म्हणते आहे."

ॲनी म्हणाली–" हे शिपाई आले ना, म्हणून यंदा थंडी लवकर पडायला लागली. आमचे बाबा नेहमीं म्हणत, लढाई सुरु झाली किं हवा बिघडते, का हवा बिघडली कीं लढाई सुरु होते–काय तें मला नीटसं आठवत नाहीं."

" ॲनी हे कपडे काढ नि स्टोव्हजवळ ये."

" छे: ! शक्य नाहीं ! ते येत आहेत."

" कोण ? " मॉलीनं विचारलं.

" मेयर, डॉक्टर नि दोघे तरुण. " ॲनीनं उत्तर दिलं.

" इथं ? कशाला ? "

ॲनीनं हात पुढं करून म्हटलं " हें घे. " तिच्या हातांत लहानशी पुडी होती. " अग हें कर्नलच्या प्लेटमधलं मांस आणलंय् मी चोरून. "

मॉलीनं पुडी सोडली व तुकडा तोंडांत टाकून चावीत म्हणाली. " पण तुला मिळालं का ? "

" अग मीच शिजवितें, नाहीं का ? मला नेहमीं थोडंसं मिळतं. "

" ते केव्हां येणार आहेत ? "

चाहूल घेऊन, ॲनी हलक्या आवाजांत म्हणते. " ते दोघे अँडर्स तरुण होडीतून इंग्लंडला जाणार आहेत. त्यांनीं गेलंच पाहिजे. सध्यां ते लपून छपून राहात आहेत. "

" का ? " मॉलीनं विचारलं.

" त्यांचा भाऊ जॅक आडवतो ना. त्यानं गाडी उलटविली म्हणून त्याला आज गोळी घालण्यांत आली. त्याच्या कुटुंबांतील इतर माणसांना पकडायला शिपाई शोधाशोध करीत आहेत. या शिपायांची शोधशोध कशी चालते तुला ठाऊक आहे. "

" हं. ठाऊक आहे मला. ॲनी, बस ना पण जरा. "

" छेः ! मला बिलकुल वेळ नाहीं बसायला. इथं सगळं ठीक आहे. म्हणून मेयरनां कळाविलं पाहिजे. " " ॲनी तुला येतांना पाहिलं नाहीं ना कुणी ? "

ॲनी अभिमानानं हंसून म्हणाली. " पाहिलं बरं ! मी आतां वस्ताद झाल्यें. "

" पण मेयर कसे बाहेर पडणार ? "

ॲनी हंसली. " अग त्यांनी पाहिलंच, तर जोसेफ त्यांच्या बिछान्यांत त्यांचेच रात्रीचे कपडे घालून, अगदीं मादामच्याजवळ निजला आहे. " ती पुनः हंसून म्हणाली. " जोसेफ शांत पडून राहिला म्हणजे बरं आहे. "

मॉली म्हणाली. " अशा रात्रीं समुद्रांत होड्या घालायच्या म्हणजे भयंकरच आहे "

" पण शत्रूच्या हातच्या गोळ्या खाऊन मरण्यापेक्षां बरं. "

" तें खरंच. पण मेयर कशाला इथं येणार आहेत ? "

" तें मला ठाऊक नाहीं. त्या तरुणांशीं त्यांना बोलायचं आहे. बरं मला आतां गेलं पाहिजे, मी तुला सांगायला आलें. "

मॉलीनं विचारलं, " केव्हां येणार ग ते ? "

" अर्ध्या तासांत कदाचित पाऊण तासांत येतील. " ॲनी म्हणाली. " मी पहिल्यानं येईन. म्हाताऱ्या स्वयंपाकीणीना कुणी विचारीत नाहीं. ती जायला निघाली, पण जणूं मॉलीनंच आपल्याला " म्हातारी " म्हटलं असं धरून, ती म्हणते. मी इतकी म्हातारी नाहीं बरं ! " बाहेर पडतांच तिनं दार बंद केलं.

मॉली जरा वेळ विर्णीत होती, थोड्या वेळानं ती स्टोव्हजवळ गेली व तिनं झांकण काढलं. त्यासरशीं तिच्या तोंडावर लालसर प्रकाश पसरला. तिनं विस्तव हालवून त्यांत चार कोळसे घालून ठेवले. ती खुर्चीवर जाऊन बसणार इतक्यांत दार वाजलं. ती जातां जातां स्वतःशींच म्हणाली–" काय बरं ही ॲनी विसरली वाटतं कांहीतरी ! " पुढं होऊन तिनं विचारलं. " काय पाहिजे ? "

बाहेरून पुरुषाचा स्वर आला. तिनं दार उघडलं. " माझ्या मनांत कांही दगाफटका नाहीं. "

मॉली मागं सरली. लेफ्टनंट टॉंडर तिच्या मागोमाग आंत आला. मॉलीनं विचारलं, " कोण तुम्हीं ? काय काम आहे ? खबरदार आंत याल तर ? काय काम आहे ? "

लेफ्टनंट टॉंडरच्या आंगात राखी रंगाचा ओव्हरकोट होता. आंत येतांच त्यानं हेल्मेट काढून घेतला व विनवणीच्या स्वरांत म्हणाला. " मला आंत येऊं दे. मी कांही अपाय करणार नाहीं. "

मॉलीनं विचारलं. " काय पाहिजे ? "

तो आल्यानंतर तिनं दार लावून घेतलं. तो बोलूं लागला. " मला तुमच्याशीं बोलायचंय् बस्स, मला तुमचं बोलणं ऐकायचंयू. हेंच, एवढंच मला हवंय्. "

" तुम्हीं हें जबरदस्तीनं करूं पाहतां काय ? " मॉलीनं विचारलं.

" नाहीं. मला थोडावेळ थांबू द्या. मग मी जाईन. "

टॉंडरनं आपल्या म्हणण्याचं स्पष्टीकरण केलं. " तुम्हांला कळेल कां– तुमचा विश्वास तरी बसेल का यावर ? अगदीं थोड्यावेळासाठीं–कांही क्षणा.

पुरतं—आपण ही लढाई विसरून जाऊं शकणार नाहीं का ! अगदीं थोडावेळ आपण दोघंजणं एकमेकांशीं चार शब्द नाहीं का बोलूं शकणार ? ”

मॉली कितीतरी वेळ त्याच्या तोंडाकडे पहात होती, शेवटीं तिच्या ओंठावर स्मित झळकलं.

“ मी कोण आहे तुला ठाऊक आहे ! ” तिनं प्रश्न केला.

टॉंडर म्हणाला. “ मी तुला शहरांत पाहिलं आहे. तूं मोहक आहेस हें मला ठाऊक आहे. मला तुझ्याशीं बोलावंसं वाटतं, हें पण मला कळतं. ”

मॉलीच्या मुद्रेवर अजून स्मित विराजत होतं. ती हळू स्वरांत म्हणाली. “ मी कोण आहे हें तुला ठाऊक नाहीं. ” ती खुर्चीत बसली असून टॉंडर, एखाद्या लहान मुलाप्रमाणं—अजागळासारखा उभा होता. मॉली हलक्या सुरांत बोलूं लागली. “ तुला एक एकट्यासारखं वाटतं नाहीं का ! ” टॉंडर ओंठावरून जीभ फिरवीत म्हणाला. “ बरोबर ! तुला कळलं. मला वाटलंच तुला कळेल म्हणून. मला वाटलंच किं तुला कळल्याविना राहणार नाहीं. ” तो भराभर बोलूं लागला. “ मला या एकलेपणानं आजारी पडायची वेळ आलीय. मी या शांत नि द्वेषाच्या वातावरणांत एकटा एक वावरत आहे. ” त्यानं अजीजीच्या स्वरांत विचारलं. “ आपण दोघं थोडा वेळ तरी नाहीं का बोलूं शकणार ? ”

मॉलीनं विणकाम हातीं घेतलं. तिनं सावकाशपणं पुढच्या दाराकडे पाहिलं. “ तुला इथं पंधरा मिनिटांपेक्षां अधिक बसतां येणार नाहीं. लेफ्टनंट, बस ना. ”

तिची नजर पुन: दाराकडे गेली. दार करकरल्याचा आवाज झाला. टॉंडर चपापून उद्गारला. “ इथं कुणी आहे का ? ”

“ कुणी नाहीं. छपरावर बर्फ दाट सांचलय्. तें साफ करायला माझ्या घरांत आतां कुणी पुरुष माणूस नाहीं. ”

टॉंडरनं हळूच विचारलं- “ आम्ही कांही केलं का ? आमच्या हातून तें घडलं का ? ”.मॉलीनं दूरवर पहात मान हलवून “ हो, ” म्हटलं.

तो खालीं बसला. " वाईट वाटतं मला." थोड्या वेळानं तो म्हणतो. " मला कांही करतां आलं असतं तर बरं झालं असतं, असं मला वाटतं. मी छपरावरचं बर्फ झाडवून काढीन. "

" नको, " मॉली म्हणाली.

" कां ? त्यानं विचारलं.

" कारण मग लोकांना असं वाटायचं कीं मी तुम्हांला सामिल झालें आहे. ते मला बाहेर काढतील नि तें मला नको आहे. "

टॉंडर म्हणाला. " हं–आतां आलं लक्ष्यांत. तुम्ही सारेजण आमचा द्वेष करतां. पण तुझी परवानगी असेल तर मी तुझी काळजी घेईन. "

आतां परिस्थिती आपल्या हातांत आली आहे, हें आतां मॉलीच्या ध्यानांत आलं; किंचित निष्ठुरपणं ती डोळे आकुंचित करून म्हणते. " पण हें तुम्हीं विचारतां तरी कशाला ? तुम्ही जेते आहां. तुम्हांला परवानगीची काय जरूर ? पाहिजे ती गोष्ट तुम्हीं घेतां. "

" मला तें. नको आहे. तसं मला नको आहे. " टॉंडर म्हणाला.

मॉली आणखी थोड्या क्रूरपणं हंसून म्हणाली. " लेफ्टनंट, तूं मला आवडावास असंच वाटतं किनई तुला ? "

" हो " तो म्हणाला. तो मान वर करून पुढं म्हणाला. " तूं इतकी मोहक आहेस. तुझे केंस किती सोनेरी आहेत. आज कितीतरी दिवस मला स्त्रीच्या मुद्रेवर दया अशी दिसलीच नाही. "

" तुला माझ्या तोंडावर दिसते का ? " मॉलीनं प्रश्न केला.

तो तिच्याकडे निरखून पहात म्हणाला " दिसावी अशी माझी इच्छा आहे."

ती खाली नजर फिरवून पहात म्हणाली. " लेफ्टनंट, तूं माझ्यावर प्रेम करीत आहेस, नाहीं का ? "

तो कसंतरी म्हणाला. " मी तुला आवडावा, असं मला वाटतं. खरंच मी तुला आवडलों पाहिजे. मी तुला रस्त्यांत पाहिलंय्. रस्त्यांतून बाजूनं जातांना माझी दृष्टी तुझ्याकडे लागलेली असे. तुला त्रास पोंचूं नये अशा अर्थाचे मी हुकूम सोडले आहेत. तुला कधी त्रास झाला का ?

मॉली शांतपणं म्हणाली. " नाहीं. मला त्रास झाला नाहीं. "

टॉडरच्या तोंडून भावनावेगानं शद्ब बाहेर पडूं लागले. " मी तुझ्यावर काव्यसुद्धां रचलंय्. माझी कविता दाखवूं कां तुम्हांला ? "

ती औपराधिकपणं म्हणाली. " लांबलचक आहे का कविता ? कारण तुला लवकरच जावं लागेल. "

तो उत्तरला. " नाहीं ! छेः अगदी छोटी आहे. अगदीं लहानशी कविता आहे. " कोटाच्या खिशांतून कागदाची घडी काढून त्यानं तिच्या हातांत दिली. ती दिव्यापाशीं वांकली, व चश्मा लावून सावकाशपणं वाचूं लागली.

" तुझे स्वर्गीय नेत्र मला आकर्षून घेतात, व माझं पाऊल जागच्या जागीं थबकतं.

माझं हृदय विचारांच्या उसळत्या नीलसागरांत न्हाऊन निघतं. "

( अशा अर्थाची ती छोटी कविता होती. )

तिनं कागदाची घडी करून मांडीवर ठेवीत विचारलं. " लेफ्टनंट, तूं लिहिलीस ही कविता ? "

" होय. " तिनं टोमणा मारीत विचारलं. " मला उद्देशून ? " टॉडरनं गुटमळत म्हटलं " हो. " ती स्मितपूर्ण मुद्रेनं त्याच्याकडे रोखून पहात तिनं विचारलं. " लेफ्टनंट, तूं नाहीं लिहिलीस ही कविता. खरं सांग. " खोटं " बोलतांना लहान मुलाला अचूक पकडावं तसा चेहरा करून त्यानं उत्तर दिलं नाहीं. माझी नाही ही कविता. "

मॉलीनं विचारलं. " कुणाचं काव्य आहे हें काव्य ? "

टॉडरनं उत्तर दिलं. " ही हाईनची कविता आहे. " तुझ्या नीलसर नेत्रांस-" हें त्या कवितेचं नांव. मला ही कविता फारफार आवडते. " असं म्हणून तो लाजून हंसला. मॉलीही हंसली. एकदम दोघंही बरोबर हंसूं लागलीं. एकदम तो हंसायचा थांबला, त्याच्या डोळ्यांत विषण्णता उमटली. " आज कितीतरी दिवसांत मी असा हंसलों नाहीं, "-तो बोलूं लागला. " त्यांनी आम्हांला असं सांगितलं कीं, लोकांना आम्हीं आवडूं, लोक आमची स्तुती

करतील, वाहवा करतील. लोक आमचा द्वेष करतात. " आपल्याला फारच थोडा वेळ राहिला आहे हें जाणूनच कीं काय त्यानं विषय बदलला. " तूं इतकी सुंदर आहेस ! खरोखर तूं सुहासिनी आहेस. " मॉली म्हणाली. " लेफ्टनंट, तूं माझ्यावर प्रेम करायला सुरवात केलीस हं. तुला क्षणभरानं जावं लागेल. " टॉडर म्हणाला. " असेल. माझ्या मनांतून तुझ्यावर प्रेम करायचं असेल. ? मणसाला प्रेमाची जरूर आहे. प्रेमाशिवाय माणूस मरून जाईल. प्रेमाभावीं त्यांचं अंतःकरण सुकून जातं व छाती लांकडाच्या ओंड्यासारखी होते. मी एकला आहे. "

मॉली खुर्चीवरून उठली. तिनं भयभीतपणं दाराकडे पाहिलं, ती स्टोव्हपाशीं जाऊन परत फिरली. तिची मुद्रा कठोर झाली, व डोळ्यांत सूडाची ज्वाला झळकली. " लेफ्टनंट, माझ्याबरोबर झोंपणार का ? "

" मी तसं नाहीं म्हटलं; असं कां विचारतेस ? "

मॉली निष्ठुरपणं म्हणाली. " माझी तुला किळस वाटत असेल कदाचित. माझं एकदां लग्न झालं होतं. माझा नवरा वारलाय्. मी कुमारिका नाहीं. " तिच्या आवाजांत कडवटपणा भरला होता.

" मी तुला आवडावा. एवढीच माझी इच्छा आहे. " टॉडर म्हणाला.

मॉली म्हणाली, " मला माहीत आहे. तूं सुसंस्कृत आहेस. प्रियाराधन परस्पर असेल तरच परिपूर्ण व सुखदायी असतं हें तुला कळतं. "

टॉडरनं म्हटलं " तसं बोलूं नको ! तसं नको बोलूं ? "

मॉलीनं चटकन् दाराकडे नजर फेंकली. ती म्हणाली. " लेफ्टनंट, आम्ही लोक जिंकले गेलों आहों. तुम्हीं अन्न हिरावून नेलं आहे. मला भूक लागलीय्. तूं जर मला जेवूं घातलंस, तर मला तूं अधिक आवडशील. "

टॉडर आश्चर्यचकित होऊन म्हणाला. " काय म्हणतेस तूं ? "

" लेफ्टनंट, माझा तुला वीट का आलाय् ? आला असेल कदाचित्. माझा भाव दोन सॉसेजीस् आहे. "

टॉडर म्हणाला. " असं नको बोलूं ! "

" लेफ्टनंट, गेल्या महायुद्धानंतर खुद्द तुझ्या देशांतल्या तरुण मुलींची काय अवस्था झाली होती ! एका अंड्यावर किंवा पावाच्या तुकड्यावर हवी ती मुलगी मिळत असे. लेफ्टनंट, मी फुकस्यात का हवी आहे तुला ! माझा भाव जास्त आहे का ? "

तो म्हणाला. " थोडा वेळ तूं मला फसवलंस. पण तूं सुद्धां माझा द्वेष करतेस, नाहीं का ? मला वाटलं तूं करणार नाहींस ! "

' नाहीं ! मी तुझा द्वेष करीत नाहीं. मी भुकेली आहे नि–मी तुझा द्वेष करतें. "

" मी तुला वाटेल तें देईन पण––"

ती मध्येंच म्हणाली––" त्याला कांही तरी दुसरं नांव द्यावेसं वाटतं ना ? तुला वेश्या नको आहे असाच ना त्याचा अर्थ ? "

टॉडर म्हणाला. " मी काय म्हणतों हें माझं मलाच समजत नाहीं. पण तूं तें द्वेषपूर्ण आहे असं दर्शवितेस. "

मॉली हंसून म्हणाली. " उपाशी असणं सुखाचं नाहीं. चांगले दोन सॉसेजेस्–आज जगांतील अमूल्य चीजा होऊं शकतात. "

" पुनः ते शद्ब उच्चारूं नकोस "–तो म्हणाला.

" कां ? खरं आहे तें " ?

" शक्य नाहीं ! तें खरं असणं शक्य नाहीं ! "

तिनें क्षणमात्र त्याच्याकडे पाहिलं व ती खालीं बसली. तिची नजर आपल्या मांडीकडे जाऊन ती म्हणाली.

' छेः ! ते खरं नाहीं. मी तुझा द्वेष करीत नाहीं. मी सुद्धां एकटीएक आहें, व छपरावर बर्फ सांचलंय्. '

टॉडर उठून तिच्यापाशीं गेला व तिचा हात आपल्या दोन्ही हातांत घेऊन मृदुस्वरांत म्हणाला. ' हें बघ, माझा द्वेष करूं नको. मी एक साधा लेफ्टनंट आहे. मी कांहीं इथं येण्याची मागणी केली नव्हती. माझा शत्रू बनण्याची कांहीं तूं मागणी केली नाहींस. मी केवळ (सामान्य) माणूस आहे. (इतरांना) जिंकणारा माणूस नाहीं. '

मॉलीची बोटं त्याच्या हातांवरून फिरलीं. ती म्हणाली. ' होय. तें मला ठाऊक आहे. ' टॉंडर म्हणाला. ' या साऱ्या धडपडींत, आपल्याला थोडासा जगायचा हक्क आहेच कीं. ' त्याच्या गालावर क्षणमात्र ात ठेवीत ती म्हणाली. ' होय. '

" मी तुला सांभाळीन, " तो म्हणाला. " या कापाकापींत आपल्याला जगायचा हक्क आहेच. " त्यानं तिच्या खांद्यावर हात ठेवला. एकदम तिचं सर्वांग ताठरलं, तिचे नेत्र विस्फारले व आपण जणू स्वप्नांत आहोंत अशा रितीनं ती पाहूं लागली. त्यानं आपला हात काढीत विचारलं. ' काय झालं ! आं ! काय झालं ? ' तिची दृष्टि समोर रोखली होती. ' काय झालं ! ' त्यानं पुनः विचारलं.

मॉली चमत्कारिक स्वरांत बोलूं लागली. ' पहिल्यानं शाळेंत जायच्या दिवशींसारखा, मी त्याला लहान मुलाप्रमाणं पोशाख चढविला. पण त्याला भीति वाटत होती. मी त्याच्या शर्टची बटणं लावलीं. त्याचं सांत्वन करण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ— तो घाबरला होता. '

टॉंडरनं विचारलं. ' काय बोलते आहेस तूं ? '

मॉलीला ती वर्णन करीत असलेला प्रसंग डोळ्यांसमोर दिसूं लागला. " त्यांनी त्याला घरीं यायला कशाला परवानगी दिली कोण जाणे. तो गोंधळून गेला होता. काय चाललं आहे, याची त्याला शुद्ध नव्हती. जातांना त्यानं माझं चुंबनसुद्धां घेतलं नाहीं. तो घाबरला होता; तो शूर होता. लहान मुलगा पहिल्या दिवशीं शाळेत जाताना जसा घाबरतो, तसा तो घाबरला होता पण तो शूर होता. "

टॉंडर उठून उभा रहात म्हणाला. ' तो म्हणजे तुझा नवरा. ?'

मॉली म्हणाली. ' होय. माझा नवरा. मी मेयरकडे गेलें, पण मेयर निराश झाला होता. नंतर त्याला नेण्यांत आलं जातांना तो सरळ चालत नव्हता; त्याचा तोल जात होता. तुम्ही त्याला बाहेर घेऊन गेलेत—व गोळी घातलीत; तो प्रसंग भयंकर वाटण्यापेक्षां अधिक चमत्कारिक वाटला मला. त्यावेळीं माझा त्यावर विश्वासच बसेना. "

टॉंडर उद्गारला. " तुझा नवरा ! "

" होय. आतां या शान्त निःशब्द घरांत माझा त्यावर विश्वास बसतो आहे. घराच्या छपरावर दाट बर्फ पडलंय्, अशा वेळीं माझा विश्वास बसतोय्. पहांटेपूर्वीच्या एकलेपणाच्या जाणीवेनं, अर्धवट उब आलेल्या बिछान्यांत पडलें असतांना, माझा त्या प्रसंगावर विश्वास बसतोय्. "

टॉंडर तिच्या समोर उभा राहिला. त्याची मुद्रा दुःखानं, खेदानं काळवंडली होती. तो उद्गारला. " गुड् नाईट् ! परमेश्वर तुझं रक्षण करो ! पुनः येऊं का मी ? "

मॉलीनं भिंतीकडे पहात व त्या प्रसंगाची आठवण करीत उत्तर दिलं. " मला सांगतां येत नाहीं. "

" मी पुनः येईन, "

" मला काय ठाऊक ? "

त्यानं तिच्याकडे पाहिलं व मुकाट्यानं बाहेर पडला. मॉली अजून शून्य दृष्टीनं भिंतीकडे पहात होती. " परमेश्वर माझं रक्षण करो ! " क्षणमात्र ती तशीच उभी राहिली. हलकेच दार उघडलं गेलं व ॲनी आंत आली. मॉलीचं लक्षसुद्धां गेलं नाहीं.

ॲनी थोड्याशा रागानं म्हणाली. " दार उघडं होतं. "

मॉलीनं तिच्याकडे पाहिलं. अजून तिचे डोळे रुंदावलेले होते. " हं. होय होय. ॲनी. "

" दार उघडं होतं. आंतून एकजण बाहेर पडतांना मला दिसला. शिपायासारखा वाटला मला. "

मॉली म्हणाली. " होय. ॲनी. "

" इथं शिपाई आला होता ? "

" होय. शिपाई आला होता. "

ॲनीनं संशयीपणानं विचारलं. " इथं तो काय करीत होता ? "

" तो माझ्यावर प्रेम करायला आला होता. "

ॲनीनं विचारलं. " मॉली, तूं हें काय चालविलं आहेस ? तूं त्यांना सामिल तर झाली नाहींस ना ? कोरेलप्रमाणं तूं त्यांना जाऊन मिळाली नाहींस ना ? "

' नाहीं ! ॲनी मी त्यांना सामिल झालें नाही. '

ॲनीनं बजावलं ' बघ बरं मॉली, इथं मेयर आल्यानंतर, जर का ते शिपाई आले व काही झालं, तर त्याची सर्व जबाबदारी तुझ्यावर आहे ! '

' तो पुन: येणार नाहीं. मी त्याला पुन: येऊं देणार नाहीं. '

पण ॲनीच्या मनांतील संशय दूर झाला नाहीं तिनं विचारलं. ' मग मी त्यांना आंत बोलवूं का ? ही जागा सुरक्षित आहे असं वाटतं तुला ? '

' होय. सुरक्षित आहे. कुठं आहेत ते ? '

' ते बाहेर कुंपणाआड आहेत. ' ॲनीनं उत्तर दिलं.

' जा त्यांना आंत बोलाव. '

ॲनी बाहेर जातांच, मॉलीनं उठून केस सारखे केले व मानेला हिसडा देऊन, तिनं पुन: आनंदी दिसण्याचा प्रयत्न केला. इतक्यांत कसला तरी आवाज झाला व दोन गौरवर्ण उंच तरुण आंत आले. त्यांच्या आंगात जाकींट असून त्यावर काळे स्वेटर होते. त्यांच्या डोक्यावर विणलेल्या कापडाच्या टोप्या होत्या. ते दोघेही मजबूत असून, जुळ्या भावंडासारखे दिसत होते. ते कोळी असून त्यांची नावं विल ॲंडर्स व टॉम ॲंडर्स होतीं.

' गुड् इव्हनिंग्, मॉली. तुला कळलं असेलच ? '

' होय. ॲनीनं सांगितलं मला. पण फार भयाण रात्र आहे बाहेर पडायला. '

टॉम म्हणाला. ' पण चांदण्यारात्रीपेक्षां बरी आहे. चांदण्यारात्रीं विमानं टेहळूं शकतात. मॉली, मेयरला काय सांगायचं आहे ? '

' मला ठाऊक नाहीं. मला तुझ्या भावाचं कळलं. फार वाईट वाटतं मला ' दोघांनाही कससंच वाटलं ते स्तब्ध होते. टॉम म्हणाला ' कशी काय परिस्थिती आलीय् हें, मॉली, तुला इतरांपेक्षां चांगलं समजतं. '

' हो. चांगलं समजतं मला. '

ॲनी दारापाशीं येऊन हलक्या स्वरांत फुसफुसली. " ते आले बरं ! '
मेयर ऑर्डन व डॉक्टर विंटर दोघेजण आंत आले. त्यांनी आपले कोट व टोप्या काढून कोचावर ठेवल्या. ऑर्डननें पुढें होऊन मॉलीच्या कपाळाचें चुंबन घेतलं.

" गुड इव्हनिंग्, मॉली " तो ॲनीकडे वळून म्हणाला, " ॲनी, दाराच्या आसपास उभी रहा. पहारेकरी आले कीं एक टिचकी वाजव, पहारेकरी गेले कीं एक टिचकी वाजव आणि जर कांहीं धोका असेल, तर दोन टिचक्या वाजव. बाहेरचं दार बंद करतांना, त्याला थोडी फट ठेव म्हणजे कुणी येतंय् कीं काय हें तुला कळेल. '

" बरं, " ॲनी म्हणाली, व तिनं दार ओढून घेतलं.

डॉक्टर विंटर स्टोव्हपाशीं हात शेकत बसला होता. " तुम्हीं आज रात्रीं जाणार अशी आम्हांला बातमी लागली होती. "

" आम्हांला गेलंच पाहिजे. " टॉम म्हणाला.

ऑर्डन मान हलवीत म्हणाला. " हं तें मला ठाऊक आहे. आम्हीं ऐकलं कीं, तुम्ही मि. कोरेलला बरोबर घेऊन जाणार आहांत. "

टॉम कडवटपणं हंसून म्हणतो. ' आम्हीं तसं केलं तर अगदीं योग्य होईल असं आम्हाला वाटलं. आम्ही त्याची होडी नेत आहोंत. आम्हीं त्याला इथं मोकळा सोडूं शकत नाहीं. तो इथं रस्त्यांत दिसणं बरं नाहीं. '

ऑर्डन खिन्नपणं म्हणाला ' तो निघून गेला असता तर बरं झालं असतं त्याला बरोबर नेणं म्हणजे तुम्हाला भीतीच आहे. '

' तो इथं रस्त्यांत दृष्टीस पडणं बरं नाहीं—' विल आपल्या भावाच्या वाक्याचा पुनरुच्चार करीत म्हणाला. ' तो इथं लोकांच्या दृष्टीस पडतां कामां नये. '

विंटरनं विचारलं. ' तुम्ही त्याला नेऊं शकतां का ? तसा तो खबरदारी बाळगणारा माणूस नाहीं काय ? '

' हो. तसं म्हटलं तर एका अर्थानं तो सावधगिरी बाळगणारा आहे. बारा वाजलेले असले तरी तो घरीं चालत जातो. आम्हीं भिंतीच्या आड राहूं.

त्याच्या मागील बागेतून त्याला होडीपाशीं आणतां येईल. तिथं त्याची होडी बांधून ठेवलेली आहे. आजच आम्ही होडीवर तयारी करीत होतों.' पुनः ऑर्डननं बजावलं, 'मला वाटतं तुम्हांला त्याला बरोबर न्यायला न लागतं तर बरं होतं. तो बरोबर घेणं म्हणजे संकटांत आणखी एक भर घालणं आहे. त्यानं जरा का गडबड केली कीं पहारेकरी लगेच धांवत येतील.'

टॉम म्हणाला. "तो गडबड करणार नाहीं. बरं तो समुद्रांतच कुठंतरी नाहींसा झाला तर फारच बरं होईल. नाहीं तरी शहरांतील लोक गांठून त्याला ठार मारतीलच, नि मग कित्येकांना प्राणास मुकावं लागेल. तो आमच्या बरोबर येणं हेंच बरं होईल."

मॉलीनं विणकाम हातीं घेतलं. तिनं विचारलं. "तुम्हीं त्याला समुद्रांत फेंकून देणार ?" विल लाजला. "मादाम, तो समुद्रांत जाणार." नंतर मेयरकडे वळून त्यानं विचारलं. तुमच्या मनांतून आम्हांला कांहीं सांगायचं होतं?"

"हो-मला तुमच्याशीं बोलायचं होतं. डॉक्टर विंटर व मी आम्हीं त्याचा खूप विचार केला.—न्याय, अन्याय, स्वारी-किती तरी बोलायचंय् आपल्या लोकांवर स्वारी, हल्ला झालाय्—पण मला वाटतं, ते जिंकले गेले नाहींत."

इतक्यांत दारावर जोरानं टिचकी वाजली व त्यासरशीं तावडतोब खोलींत शांतता पसरली. मॉलीच्या हातांतील सुया जागच्याजागीं थबकल्या, आणि मेयरनं पुढं केलेला हात, तसाच हवेंत लोंबकळत राहिला. टॉम डाव्या हातानं कान खाजवीत होता त्याचा हात तिथंच राहिला. खोलींतील प्रत्येक व्यक्ति अगदीं निश्चल होती. प्रत्येकाचे डोळे दारावर खिळले होते. नंतर प्रथम अस्फुटपणं व नंतर वाढत वाढत पहारेकऱ्यांच्या बुटांचा खाड् खाड् आवाज येऊं लागला; त्यांच्या बुटांची करकर व त्यांचं बोलणं ऐकूं येत होतं. ते दारावरून निघून गेले व त्यांच्या पावलांचा आवाज ऐकूं येईनासा झाला. दारावर दुसरी टिचकी वाजली. लगेच खोलींतील वातावरण पालटलं. इतका वेळ मुठींत जीव धरून बसलेल्यांना "सुटलों," असं वाटलं.

ऑर्डन म्हणाला. "ॲनी बाहेर बसलीय् ती थंडीनं कुडकुडत असेल."

त्यानं आपला कोट उचलला, आंतलं दार उघडलं व फटींतून कोट बाहेर देत म्हटलं " ॲनी कोट घाल पाहूं. "–लगेच त्यानं दार बंद केलं.

" ॲनीशिवाय माझं कसं काय चालेल सांगतां येत नाहीं. ती कुठंही जाते, सारं कांहीं पाहते व ऐकते. "

टॉम म्हणाला. " आम्हांला लवकरच निघालं पाहिजे. "

विंटर म्हणाला. " मि. कोरेलला न्यायला विसरलांत, तर मला वाटतं, बरं होईल. "

" तें शक्य नाहीं. तो इथं रस्त्यांत दिसणं बरं नाहीं. " त्यानं मेयरकडे प्रश्नार्थक मुद्रेनं पहात म्हटलं.

ऑर्डन सावकाश बोलूं लागला. " मला कांहीं साध्या गोष्टी सांगायच्या आहेत. हें शहर लहान आहे. इथं न्याय अन्यायसुद्धां लहानसहान गोष्टींत आहे. तुझ्या भावाला गोळी घालण्यांत आली, अलेक्स मॉर्डनला गोळी घालण्यांत आली. देशद्रोह्याचा सूड घ्या. लोक चवताळले आहेत पण त्यांना फेरहल्ला चढवायला मार्ग नाहीं. पण हें सगळं अल्प प्रमाणांत आहे. हा लढा, कल्पनेविरुद्ध कल्पना असा नसून, जनतेविरुद्ध जनता असा आहे. "

विंटर म्हणाला. " माझ्या सारख्या डॉक्टरनं नासधूशीबद्दल बोलणं गंमतीदार वाटेल, पण मला वाटतं, कीं सर्व जिंकलेली जनता मनांतून प्रतिकारासाठीं हपापलेली असते. आपल्या हातांतील शस्त्रं काढून घेऊन आपल्याला निःशस्त्र करण्यांत आलं आहे. आपलं शरीर व तेजस्वी भावना या पुरेशा पडणार नाहींत. निशस्त्र माणसाचं धैर्य खचतं. "

विल अँडर्सनं विचारलं, " या साध्या बोलण्याचा अर्थ काय ? आम्हीं काय करावं असं तुम्हांला वाटतं ? "

' आम्हांला त्यांच्याशीं लढायचं आहे पण आम्ही लढूं शकत नाहीं. त्यांनी आमच्या जनतेची उपासमार सुरु केली आहे. उपासमारीनं कमकुवतपणा येतो. तुम्हीं इंग्लंडला जात आहांत. कदाचित तुमचं कुणी ऐकणार नाहीं–पण आमचा–एका लहानशा शहराचा–निरोप त्यांच्या कानीं घाला. ' आम्हांला शस्त्रे द्या. "

टॉमनं विचारलं. ' तुम्हाला तोफा हव्यात ? '

इतक्यांत दारावर टिचकी वाजली व सारे जागच्याजागीं थिजल्यासारखे झाले. बाहेरून पहारेकऱ्यांचा आवाज आला खरा—पण ते धांवत आहेत—असा आवाज आला. विल लगेच दाराजवळ सरकला. धांवण्याचा आवाज घराजवळ आला. अस्फुट आवाजांत हुकूम दिला गेला—व पहारेकरी धांवत निघून गेले व दारावर दुसरी टिचकी वाजली.

मॉली म्हणाली. ' ते कुणाचा तरी पाठलाग करीत असले पाहिजेत. कुणाच्या बरं मागं लागले असतील आतां ? '

टॉम चुळबुळ करीत म्हणाला. " आम्हांला आतां निघालं पाहिजे. बरं, तुम्हांला तोफा हव्या आहेत का ? आम्हीं तोफा मागूं का ? "

" थांबा, तसं नको. इथं कशी काय परिस्थिती आहे, ती त्यांना नीट समजावून सांगा. त्यांना सांगा कीं, आमच्यावर करडी नजर ठेवण्यांत आली आहे, आम्हीं जरा कां हालचाल केली कीं आमच्यावर दडपशाही करण्यांत येते. आम्हांला जर साधीं, लहानशीं—स्फोटक द्रव्यं, रेलगाड्या उलटविण्यासाठीं डायनामिटच्या कांड्या, हातबॉंब, फार काय विषसुद्धां अशी कांहीं गुप्त छोटीं हत्यारं हवी आहेत. " तो त्वेषानं बोलूं लागला. " हें कांही धर्मयुद्ध नव्हे. ही लढाई, खून नि फितुरी यांनीं बरबटलेली आहे. आमच्यावर शत्रूनं ज्या युक्त्या योजल्या त्याच आपण त्याच्यावर योजूं या ! ब्रिटिश बॉंबफेकी विमानं कारखान्यावर मोठ मोठे बॉंब फेकूं देत, पण त्या बरोबरच, रेल्वेच्या रुळाखालीं दडविण्यासाठीं, गाड्या उलटविण्यासाठीं, टॅंक उलटविण्यासाठीं—छोटे छोटे, बॉंब, आमच्याकरितां टाकूं देत. नंतर आम्हीं गुप्तपणं सशस्त्र होऊं. मग आमच्यापैकीं कोण सशस्त्र आहे, याचा शत्रूला मागमूसही लागणार नाहीं, बॉंबफेकीं विमानं आमच्यासाठीं अशीं साधीसुधीं हत्यारं आणूं देत, त्यांचा कसा काय उपयोग करायचा ते आम्हांला कळेल ! "

विंटर मध्येंच म्हणाला. " कुणावर हल्ला करायचा तें शत्रूला मुळींच समजणार नाहीं. शिपायांना, पहारेकऱ्यांना आमच्यापैकीं, कोण सशस्त्र वा निशस्त्र आहे हें कळायचं नाहीं. "

टॉमनं कपाळ पुसलं. "आम्हीं जर सरळ जाऊन पोंचलों–तर तुमचा निरोप त्यांना सांगू, पण मी असं ऐकलंय् कीं इंग्लंडात असे कांहीं सत्ताधारी आहेत, कीं ज्यांना जनतेच्या हातीं हत्यारं द्यावीं असं वाटत नाहीं."

ऑर्डन त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागला. "हं, अरे तें माझ्या लक्षांत आलंच नाहीं, पण आपण प्रयत्न करून पाहूं या. इंग्लंड किंवा अमेरिकेंत अशा लोकांच्या हातीं राज्यसूत्रं असतील, तर जग आटोपलंच समजा. त्यांनीं जर ऐकलं, तर त्यांना आपलं म्हणणं नीट समजावून सांगा. आम्हांला मदत मिळालीच पाहिजे." त्याची मुद्रा कठोरपणा धारण करूं लागली, "जर कां आम्हांला मदत मिळाली, तर आम्ही स्वतःला सांवरूं शकूं."

विंटर म्हणाला, "त्यांनीं जरी आम्हांला नुसतं डायनामीट दिलं, तरी आम्हीं तें जमिनींत पुरुन ठेवूं व वेळप्रसंगीं त्याचा उपयोग करूं. शत्रूला, मग आम्हीं तिळमात्र शांतता लाभूं देणार नाहीं. ! कधींही नाहीं ? त्याची सांठे-सामुग्री आम्हीं उडवून देऊं !"

खोलींतील वातावरण प्रक्षुब्ध होऊं लागलं. मॉली त्वेषानं उदगारली, "आम्हीं त्याच्या विश्रांतिवर–फुरसतीवर धाड घालूं ! आम्हीं त्यांना क्षणभर झोंप लागूं देणार नाहीं. आम्हीं त्याला जेरीस आणूं व त्याचा अचूकपणा खोटा पाडून दाखवूं.'

विलनं सावकाशपणं विचारलं. 'झालं ? एवढंच ना ?'

'हं. आमच्या सांगण्याचा मतितार्थ एवढाच.'

'पण त्यांनी आमचं म्हणणं ऐकून घेतलं नाहीं तर ?'

'जसा आजपर्यंत तुम्हीं निसटण्याचा प्रयत्न करीत आहां, तसाच हा पण प्रयत्न करून पहा.'

'झालं ? एवढंच ?'

दार उघडून ॲनी हलकेच आंत आली. ऑर्डन बोलूं लागला. 'एव-ढंच. तुम्हांला जर आतां बाहेर पडायचं असेल, तर रस्ता निर्धोक आहे कीं नाहीं, तें ॲनीला पाहून येऊं दे.' त्यानं वर पाहिलं तों ॲनी आंत आलेली.

ती म्हणाली–' एक शिपाई या बाजूला येत आहे. मघां इथं आलेल्या शिपाया-सारखा दिसतोय् तो. मघां मॉलीबरोबर इथं एक शिपाई होता.'

सर्वांच्या नजरा मॉलीकडे वळल्या. ॲनी म्हणाली. ' मी दाराला कुलूप लायलंय्.'

' काय हवंय त्याला ?' मॉलीनं विचारलं, ' तो परत कशाला आला ?'

बाहेर दारावर हलकेच टिचकी वाजली. ऑर्डन मॉलीपाशीं जाऊन म्हणाला. '' मॉली हें ग काय ? तूं संकटांत का आहेस ?'

' नाहीं ?' ती म्हणाली. ' नाहीं ! मागच्या बाजूनं बाहेर पडा. चला, लवकर बाहेर पडा !'

बाहेर दारावर टिचक्या वाजतच होत्या. बाहेरून हलकेच पुरुषाचा आवाज आला. मॉलीनं स्वयंपाकघराचा दरवाजा उघडला. ' चला, चला लवकर बाहेर पडा !'

मेयर तिच्यासमोर उभा राहून म्हणाला. ' मॉली, तूं संकटांत तर नाहींस ना ? तुझ्या हातून कांहीं घडलं तर नाहीं ना ?'

" ॲनी थंडपणं म्हणते, हा मघांचाच शिपाई दिसतोय. इथं मघां एक शिपाई होता."

" होय होता." मॉली मेयरला म्हणाली. " मघां इथं एक शिपाई होता."

" मेयरनं विचारलं. त्याला काय हवं होतं ?"

" त्याला माझ्यावर प्रेम करायला हवं होतं.'

" पण त्यानं केलं नाहींना ?"

" नाहीं." ती म्हणाली. "त्यानं प्रेम केलं नाहीं. बरं आता जा. मी माझी काळजी घेईन." ऑर्डननं म्हटलं. " मॉली तूं जर संकटांत असलीस तर आम्हीं मदतीला धांवूं, आम्हाला मदत करूं दे."

" मी अशा संकटांत सांपडलें आहे कीं, त्यांत मला कुणीच मदत करूं शकणार नाहीं. बरं जा आतां." असं म्हणून तिनं त्यांना दाराबाहेर ढकललं.

ॲनी मागं राहिली. तिनं मॉलीकडे पहात विचारलं." मॉली या शिपायाला काय हवंय ? " " काय हवंय त्याला तें तेंच मला कळत नाहीं."

" तूं त्याला कांहीं सांगणार आहेस ? "

" नाहीं. " आश्चर्यचकित होऊन मॉलीनं पुनः म्हटलं. " नाहीं. " व पुनः निर्धारानं ती म्हणाली– "नाहीं, ॲनी मी कांहीएक सांगणार नाहीं."

ॲनीनं तिच्याकडे रागानं पाहिलं. " मॉली, तूं त्याला कांही न सांगितलंस तर बरं ! " असं म्हणून ती दार ओढून घेऊन बाहेर पडली.

बाहेर दारावर टिचक्या वाजत असून पुरुषाचा आवाज ऐकूं येत होता.

मॉली खोलीच्या मधोमध असलेल्या दिव्यापाशीं केली व तिच्या मनावरील दडपण तिला अधिक जड झाल्यासारखं वाटूं लागलं.

तिची नजर दिव्याकडे गेली. तिनं टेबलावर पाहिलं तो विणकामाजवळ पडलेली मोठी कात्री तिला दिसली. तिनं पातं धरून ती आश्चर्यानं उचलली. तिनं पात्यावरून बोटं फिरविलीं; ती लांब पातीं सुरीप्रमाणं धरली–तिच्या दृष्टींत भीति भरलेली दिसली. तिनं दिव्याकडे पाहिलं प्रकाशानं तिचं तोंड उजळलं. तिनं हळूच कात्री उचलून आपल्या आंगावरील कपड्यांत लपविली.

दारावर टपटप आवाज येतच होता. बाहेरून हांक मारलेली तिला ऐकूं आली. ती दिव्यावर वांकली व तिनं दिवा फुंकर मारून विझविला. खोलींत सर्वत्र काळोख पसरला होता. नाहीं म्हणायला शेगडीतील निखारे अंधुकपणं धगधगत होते. तिनं दार उघडलं मोठ्या कष्टानं ती गोड आवाजांत म्हणाली. " मी येतें, लेफ्टनंट, मी येतें. ! "

---



त्या रात्रीं आकाशांत चंद्राची अर्धकोर दिसत असून, किंचित पण पांढरं शुभ्र चांदणं पसरलं होतं ध्रुवावरून वहात येणारा बोचक थंडगार वारा, सावकाशपणं बर्फावरून वहात होता. जमिनीवर बर्फाचा वाळूसारखा घट्ट थर जमा झाला होता. घरं बर्फाआड दडून बसल्यासारखी दिसत होतीं. थंडीच्या कडाक्यामुळं खिडक्या बंद असून, मधूनच कुठं तरी धूम्ररेखा तरळतांना दिसत होती.

शहराच्या रस्त्यांचे फुटपाथ बर्फ सांचल्यानं गोठून कडक बनले होते. रस्ते एरवीं निश:ब्द असत, फक्त कुडकुडणारी पहारेकऱ्यांची तुकडी जाई, त्यावेळींच काय तो शांततेचा भंग व्हायचा. काळोखांत घरं गडद काळी दिसत होती. थोडीफार उष्णता घरांत जणूं रेंगाळत होती. खाणीच्या प्रवेशद्वारापाशीं, पहारेकरी आकाशाकडे आपलीं ध्वनि–आकर्षक यंत्रे लावून बसले होते. चांदणी रात्र असल्यानं त्यांना बॉंबहल्ल्याची धास्ती वाटत होती, म्हणून विमानाची दुरंत घरघर आकर्षून घेणाऱ्या यंत्राचे कर्णे ते आकाशाकडे फिरवीत होते. अशा चांदण्या रात्रीं पोलादी शेपटाचे बॉंब सळसळत आकाशांतून खालीं वर्षत व जमिनीवर पडल्याबरोबर भयंकर मोठा आवाज होऊन त्यांच्या कपऱ्या सर्वत्र उडत. आज चांदणं जरी म्हणण्याइतकं टिपूर नसलं ,तरी आकाशांतून जमीन खात्रीनं दिसली असती.

खेड्याच्या अगदीं टोंकाला, लहान लहान घरं होती. तिथं एक कुत्रं उच्चरवानं, थंडी व एकलेपणाविरुद्ध गाऱ्हाणं गात होतं. जगाची परिस्थिती त्याला जशी वाटली, त्याचं लांबलचक वर्णन तो नाक वर करून आपल्या देवासमोर जणूं करीत होता. तो कसलेला गवई असून, त्याचा आवाज ठणठणीत व चढ्या सुरांतला होता. खिन्नपणं गस्त घालणाऱ्या सहा पहारेकऱ्यांनी, त्यांचं भुकणं ऐकलं. कान, तोंड, डोकं अगदीं घट्ट गुंडाळून घेतलेला असा त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला. " हें कुत्रं पहावं तों दररात्रीं अधिकाधिकच पिसाळतंय् असं वाटतं. मला वाटतं, आपण याला गोळी घातली पाहिजे."

दुसऱ्यानं विचारलं. " कां रे ? भुकूंदे बिचाऱ्याला. त्याचं भुंकणं आवडतं मला. माझा कुत्रासुद्धां असाच भुंकत-रडत असे. पिवळा कुत्रा होता तो, मीं त्याला कधीं कांहीं शिकवूं शकलों नाहीं. कुत्रा रडला किंवा भुंकला तरी मला त्याचं कांहीं वाटत नाहीं. इतर कुत्र्यांबरोबर, माझ्या पिवळ्या कुत्र्यालासुद्धां त्यांनीं धरून नेलं." हें बोलतांना त्याचा आवाज जड पण तिऱ्हाइतासारखा वाटत होता.

यावर कॉर्पोरल म्हणाला. " आपल्याला जरूर असलेलं अन्न कुत्र्यांना घालणं शक्य नव्हतं."

" अरे मी तक्रार नाहीं करीत. कुत्र्यांना धरून नेणं जरूर होतं हें मला समजतं. आपले पुढारी जशा योजना आंखतात, तशा मी आंखूं शकत नाहीं. पण मला गंमत वाटते ती याची कीं, इथं कांहीं जणांचे कुत्रे आहेत, व त्यांच्यापाशीं तर आपल्या इतकंसुद्धां अन्न नाहीं. अर्थात कुत्रे काय किंवा लोक काय अगदीं हाडकुळे दिसतात म्हणा."

" वेडे आहेत हे लोक," कॉर्पोरल उद्गारला. " म्हणून तर इतक्या लवकर ते जिंकले गेले. आपल्याप्रमाणं यांना योजना आंखतां येत नाहींत."

" लढाईनंतर आपल्यापाशीं कुत्रे शिल्लक राहतील कीं नाहीं कुणास कळे." त्या शिपायानं आश्चर्य व्यक्त केलं व पुढं म्हणाला. " अमेरिकेतून

किंवा इतर कुठून तरी कुत्रे आणून आपण पुन: त्यांची पैदास करूं. अमेरिकेंत कोणत्या जातीचे कुत्रे असतील तुला वाटतं ? "

" मला नाहीं ठाऊक. " कॉर्पोरलनं उत्तर दिलं. " अमेरिकेंत सगळाच वेड्यांचा बाजार आहे तसेच त्यांचे कुत्रे असणार." तो पुढं बोलूं लागला,

" मला वाटतं कुत्रे एकंदरीत वाईटच. पोलिसांना मदत म्हणून, मला वाटतं फार तर कुत्र्यांचा उपयोग करावा. "

" हं तसंही असेल कदाचित. " शिपाई म्हणाला. " मी असं ऐकलंय् कीं आपल्या पुढाऱ्याला ( हिटलरला ) कुत्रे आवडत नाहींत. कुत्रे पाहिले किं त्याच्या आंगाला खाज लागल्यासारखं होतं व शिंका येतात. "

" लोकं काय वाटेल तें उठवितात. " कॉर्पोरल म्हणाला. " शुः शुः ऐका ! "–पहारेकरी जागच्याजागीं थांबले. लांबून विमानांची घरघर ऐकूं येत होती.

" हीं आलीं विमानं. " कॉर्पोरल म्हणाला. पण कुठं उजेड दिसत नाहीं हें बरं आहे. पंधरा दिवसांपूर्वी आलीं होतीं नाहीं का ? "

" बारा. " शिपाई म्हणाला.

खाणीजवळच्या गार्डांनी विमानांची घरघर ऐकली. " फार उंचीवरून उडताहेत. " सार्जेट म्हणाला. कॅप्टन लॉफ्टनं मान वर करून पाहिलं. " मला वाटतं वीस हजार फूटांवर असतील. मला वाटत तीं नुसतीं वरून जात असावीत. "

" फार नाहीं दिसत. " सार्जेट घरघरीची चाहूल घेत म्हणाला. " मला वाटतं फार तर तीन विमानं असतील, अधिक नाहींत. विमानवेधी तोफा मागवूं का ? "

" तसं नको. त्यांना " हुश्शार " रहायला सांगा—नि मग कर्नल लॅन्सरला बोलवा, ; पण नको कर्नलला नका बोलवूं. कदाचित् ती इथं येणारही नसतील. अजून ती अगदीं उंचावर आहेत व बॉम्ब टाकायला लागलीं नाहींत. "

" मला वाटतं तीं वर्तुळाकार फिरत आहेत. दोनापेक्षां अधिक नसतील." सार्जंट म्हणाला. बिछान्यांत पडले असतांना लोकांनी विमानांची घरघर ऐकली. त्यांनी स्वत:ला अधिकच पांघरुणांत घेतलं व ते कान देऊन आवाज ऐकूं लागले. मेयरच्या राजवाड्यांत निजलेला कर्नल लॅन्सर या लहानशा घरघरीनं जागा झाला. डोळे रुंदावून त्यानं काळ्या छताकडे पाहिलं. आवाज नीट ऐकण्यासाठीं त्यानं क्षणमात्र श्वास रोखून धरला. पण त्याची छातीची धडधड इतक्या मोठ्यानं व्हायला लागली कीं, त्याला आवाजच ऐकूं येईना. त्याला वाटलं, श्वास रोखून धरला नसता तर आवाज ऐकूं आला असता, मेयर ऑर्डननं झोपेंतच घरघर ऐकली व त्याला स्वप्न पडलं. तो या कुशीवरून त्या कुशीवर वळला व झोपेंतच बडबडूं लागला.

आकाशांत अतिशय उंचीवर चिखलाच्या रंगाची दोन बॉंबर विमानं वर्तुळाकार फिरत होतीं, वेग वाढवून तीं वरवर चढूं लागलीं. प्रत्येक विमानांतून शेकडों लहान लहान वस्तू खालीं सुटल्या. थोड्या खालीं येतांच, छोट्या छोट्या छत्र्या उघडल्या व त्यांना बांधलेल्या लहान पाकिटांसकट त्या छत्र्या जमिनीवर तरंगत उतरूं लागल्या. पुन: विमानांनी आपला वेग वाढविला, वर चढलीं, वर्तुळाकार फिरलीं, व पुन: त्या छोट्या छत्र्या तरंगूं लागल्या. शेवटीं विमानं तोंड फिरवून आल्या दिशेनं निघून गेलीं.

छोट्या छत्र्या सांवरीच्या म्हाताऱ्यांप्रमाणं, वाऱ्यानं पांगल्या, व शेतांत बीं पेरावं त्याप्रमाणं जमिनीवर इतस्तत: पेरल्या गेल्या. त्या इतक्या सावकाश तरंगत खालीं येऊन अलगद जमिनीवर टेंकल्या कीं दहा इंच, लांबीची डायनामीटची नळकांडी जमिनीवर उभी करून ठेवल्याप्रमाणं राहिलीं, व भोंवतालीं छत्र्या मिटून पडल्या. बर्फावर छत्र्या काळ्या दिसत होत्या. छत्र्या पांढऱ्याशुभ्र शेतांत येऊन पडल्या, टेंकडीवरील रानांत पडल्या, झाडांवर अडकल्या, व फांद्यावर लोंबूं लागल्या. कांहीं त्या छोट्या शहरांतील घरांच्या छपरांवर येऊन पडल्या, कांहीं घरांपुढील लहानश्या आंगणांत पडल्या व एक तर सेंट आल्बर्टच्या पुतळ्याच्या नेमकी डोक्यावर पडली.

एक छत्री पहारेकऱ्यांच्या समोर रस्त्यांत येऊन पडली. सार्जंटनं इशारा दिला. " हं खबरदार ! टाईम-बॉंब आहे तो. "

" छे: तितका मोठा नाहीं. " शिपाई म्हणाला.

" बरं, पण त्याच्याजवळ जाऊं नका. " सार्जेटनं आपल्या बॅटरीचा झोत त्या वस्तूवर फेंकला. ती छत्री हातरुमालाच्या आकाराची असून फिक्या निळया रंगाची होती. छत्रीच्या टोंकाला निळया कागदांत गुंडाळलेलं लहानसं पाकीट होतं. "

" कुणी त्याला हात लावूं नका. " सार्जेटनं बजावलं. " हॅरी, खाणींत जाऊन कॅप्टनला घेऊन ये. आम्हीं या वस्तूवर पहारा करीत आहोंत–जा. "

सरतेशेवटीं, पहांट झाली एकदांची. लोक उठून पहातात तों बर्फावर त्यांना लहान लहान निळे पुंजके दिसले त्यांनी जाऊन ते उचलले, त्यांनी गुंडाळलेला कागद सोडला व छापलेला मजकूर वाचला. त्यांना ही भेट आहे, हें कळल त्यासरशीं प्रत्येकाच्या चेहऱ्यावर चोरटेपणा दिसूं लागला. प्रत्येकानं ती लांब नळी कोटांत दडविली व गुप्तस्थळीं जाऊन जमिनींत पुरुन ठेवली.

इतक्यांत मुलांना ही बातमी लागली. तावडतोब त्यांनीं ती वस्तु मिळविण्यासाठीं आसपासचा सारामुलूख पालथा घातला; एकाद्या मुलाला सुदैवानं निळारंग दिसला कीं लगेच धांवत जाऊन तो नळी घेऊन लपवायचा व घरीं येऊन आईबापांना सांगायचा. कांहीजण घाबरले, त्यांनीं नळया घेऊन लष्कराच्या ताब्यांत दिल्या, पण अशा लोकांची संख्या थोडी होती. थोड्या वेळानं शिपाई नळया गोळा करण्यासाठीं धांवपळ करूं लागले, पण मुलांनीं त्यांना हरविलं.

मेयरच्या राजवाड्यातील दिवाणखान्यांत, जेवणाचं टेबल, खुर्च्या, अलेक्स मॉर्डनला गोळी घालण्यांत आली, त्यादिवशी जशा होत्या, अगदीं तशा होत्या. मेयरच्या राजवाड्याचं वैभव आतां त्या जागेला राहिलं नव्हतं. भिंतीजवळ खुर्च्या नसल्यानं अगदीं भकास दिसत होतं. टेबलावर कागद अस्ताव्यस्त पडल्यामुळं, त्या खोलीला एकाद्या व्यापारी कचेरीचं स्वरूप चढलेलं दिसत होतं. फळीवरील घड्याळांत नवाचे ठोके पडले; पहांटे आकाशांत काळेकुट्ट ढग आल्यानं दिवस अंधारला होता.

ॲनी मेयरच्या खोलींतून बाहेर आली. लगेच तिनं टेबलावर झेप घातली व कागदांवर नजर फेंकली. कॅप्टन लॉफ्ट आंत आला. ॲनीला पाहातांच तो उंबरठ्यांत थबकला.

" काय चाललंय् तुझं इथं ? " त्यानं दरडावणीच्या सुरांत विचारलं.

ॲनी किंचित चिडून म्हणाली, " यस् सर. "

" मी विचारतोंय, तुझं इथं काय चाललंय् ? "

" सर, मी साफसूफ करायच्या बेतांत होतें. "

" आहे तसं राहूं दे. जा बाहेर. "

" यस सर, " करून, तो बाहेर पडेपर्यंत तशीच उभी राहिली व नंतर घाईघाईनं बाहेर गेली.

कॅप्टन लॉफ्ट, दारांतून वळून म्हणाला " अच्छा. आंत आण. " मागोमाग, खांद्यावर रायफल अडकविलेला शिपाई हातांत निळी पाकीटं घेऊन आला. पाकीटांच्या टोंकाला निळी फडकीं लोंबत होती.

" टेबलावर ठेव. " लॉफ्ट म्हणाला. शिपायानं हलकेच ती पाकीटं टेबलावर ठेवलीं. " वर जाऊन कर्नल लॅन्सरला रिपोर्ट दे, मी त्या वस्तु घेऊन आलोंय म्हणून, " शिपायानं लष्करी पद्धतिनं गिरकी मारली व बाहेर पडला.

लॉफ्टनं टेबलापाशीं जाऊन एक पाकीट उचललं व त्याचं तोंड आंबट झालं. त्यानं ती छोटी निळी छत्री उचलली व डोक्याच्या उंचीवरून खालीं सोडली, छत्री उघडली व पाकीट हलकेच तरंगत जमिनीवर टेकलं. पुनः त्यानं पाकिट उचलून तपासलं.

चटकन् कर्नल लॅन्सर व त्याच्या मागोमाग मेजर हंटर खोलींत आला. हंटरच्या हातांत पिवळा चौकोनी कागद होता. आल्याबरोबर लॅन्सर उद्गारला. ' गुड मॉर्निंग, कॅप्टन. ' असं म्हणून तो टेबलापाशीं, मुख्य जागेवर जाऊन बसला. क्षणमात्र त्यानं निळ्या पाकीटाकडे पाहिलं, नंतर एक पाकीट उचलून घेत म्हणाला, " बस, हंटर हीं तपासलींत का ? '

हंटर खुर्ची ओढून बसला. त्याचं लक्ष हातांतील पिवळ्या कागदावर होते. ‘ विशेष काळजीपूर्वक नाहीं तपासली. , तो पुढं म्हणतो. ‘ दहा मैलांच्या अंतरावर, तीन ठिकाणीं रुळांची मोडतोड झालीय. ’

“ बरं पण हीं पाकीटं पहा व तुला काय वाटतं तें सांग,” लॅन्सर म्हणाला. हंटरनें नळी घेऊन वरचं आच्छादन काढल; आंत एक लहानसं पाकीट होतं. हंटरनं सुरीनं नळी चिरली. कॅप्टन लॉफ्ट त्याच्या खांद्यावरून वाकून पहात होता. नंतर हंटरनं चिरलेल्या भागाचा वास घेतला, बोटं चोळलीं व म्हणाला. “छट् ! मूर्खपणा आहे सगळा. बाजारी डायनामीट आहे हें ! याची तपासणी केल्याशिवाय त्यांत किती टक्के नायट्रो-ग्लिसरिन आहे, तें नाहीं मला सांगता येणार. ” त्यानं नळीचं टोक पहात म्हटलं. “ त्याला रेग्युलर डायनामीट झाकण आहे, फल्मिनेट ऑफ मर्क्युरी आहे, आणि—मला—वाटतं एक मिनिट अवधीची फ्यूज जोडली आहे,” त्यानं नळी टेबलावर फेंकीत म्हटलं, “ अगदीं स्वस्त नि साधी आहे हें. ”

कर्नलनं लॉफ्टकडे पाहून विचारलं. ‘ अशा किती नळ्या विमानांनीं टाकल्या असतील ? ’ लॉफ्ट म्हणतो “ तें कांहीं सांगता येत नाहीं. आम्हीं जवळजवळ पन्नास गोळा केल्या व त्या सुमारें नव्वद छत्र्यांतून आल्या. कां कुणास ठाऊक, पण लोक नळ्या काढून घेऊन छत्र्या तशाच टाकतात, आणि मला वाटतं बऱ्याचशा आम्हांला अजून सांपडल्या नाहींत. ’

लॅन्सर हात फिरवीत म्हणतो. ‘ त्याच्यात म्हणा वास्तविक कांहीं अर्थ नाहीं. ते वाटेल तितक्या नळ्या टाकूं शकतात. आपण कांहीं त्यांना अडवूं शकत नाहीं, कीं या नळ्यांचाच उपयोग त्यांच्याविरुद्ध करूं शकत नाहीं. त्यांनीं अजून कुणाला जिंकलंच नाहीं. ’

लॉफ्ट संतापून म्हणतो “ आपण त्यांचा जगांतून नायनाट करूं शकूं !”

हंटर नळीवरील तांब्याचं झाकण न्याहाळून पहात होता. लॅन्सर म्हणाला. “ होय—तें आपण करूं शकूं. हंटर, तूं हा गुंडाळलेला कागद पाहिलास काय ? ”

“ नाहीं. अजून वेळच मिळाला नाहीं पहायला. ”

" मोठं विलक्षणच आहे. " कर्नल लॅन्सर म्हणाला. " वरचा कागद निळा असल्यानं सहज दिसतो. बरं तो बाहेरचा कागद सोडा आणि हें पहा–" असं म्हणून त्यानं एक छोटं पाकीट उचललं व म्हणाला, " हा पहा चॉकोलेटचा तुकडा. प्रत्येकजण हें चॉकोलेट शोधायला फिरेल. मी पैज मारतों कीं, आपले शिपाई खात्रीनं हें चॉकोलेट चोरणार. मला वाटतं, मुलंसुद्धां चॉकोलेट धुंडाळायला लागतील. "

इतक्यांत एका शिपायानं एक पिवळा चौकोनी कागद, कर्नलपुढं ठेवला व तो निघून गेला. लॅन्सरनं कागदाकडे दृष्टि फिरवली व कर्कशपणं हंसला. " हंटर हें घे. तुझं आहे हें. आणखी दोन ठिकाणीं रुळांची मोडतोड झालीय्. "

हंटर तांब्याचं झांकण तपाशीत होता, त्यानं प्रश्न केला. " बरं ह्या वस्तू कुठं टाकल्या आहेत ? सगळीकडे टाकल्या आहेत का ? "

लॅन्सर घोटाळयांत पडल्यासारखा होऊन म्हणाला. " तीच गंमत आहे. मी राजधानींत चौकशी केली. फक्त याच ठिकाणीं या वस्तू टाकल्या आहेत."

" मग याचा अर्थ काय लावतां तुम्हीं ? " हंटरनं विचारलं.

" कठीण आहे याचा अर्थ लावणं. मला वाटतं इथं त्यांनीं प्रयोग करून पाहिला आहे. जर इथं त्याचा उपयोग झाला, तर मग ते सगळीकडे टाकतील, बरं नाहीं झाला, तर मग या भानगडींत पडणार नाहींत. "

" बरं, मग आतां तुम्ही काय करणार ? " हंटरनें प्रश्न केला.

" इतक्या निष्ठुरपणं याचा बंदोबस्त करा कीं, ते कुठं या वस्तू टाकणार नाहींत-अशा अर्थाचा मला राजधानीहून हुकूम आलाय्. "

हंटर केविलवाण्या सुरांत म्हणाला. " पण मी पांच ठिकाणचे रूळ कसे दुरुस्त करणार ? एवढे रूळ नाहींत सध्यां माझ्यापाशीं. "

" जुन्या साइडिंगचे रूळ काढायला लागतील, असं वाटतं मला. " लॅन्सर म्हणाला. " पण मग रेलरोडचा पायाच पार बिघडून जाईल " हंटर म्हणाला.

" पण मग काय करणार त्याला ? रेलरोड तर तयार होईल. ? "

मेजर हंटरनं चिरलेली नळी टेबलावरील ढिगांत टाकून दिली. लॉफ्ट मध्येंच म्हणाला. " सर, आपण ताबडतोब हें दडपून टाकलं पाहिजे. या वस्तूचा उपयोग करायच्या आधींच, जे कुणी या वस्तू उचलतील त्यांना शिक्षा ठोठावल्या पाहिजेत. आपण ताबडतोब कामाला लागलं पाहिजे. नाहींपेक्षां आपण कमजोर आहोंत अशी या लोकांची समजूत व्हायची. "

लॅन्सर त्याच्याकडे पाहून स्मित करीत होता. शेवटीं तो म्हणाला– ' धीरे, धीरे, कॅप्टनसाहेब! घाई नको. प्रथम आपल्यापाशीं काय आहे तें पाहूं या, मग उपाय योजनेचा विचार करूं. '

त्यानं टेबलावरील ढिगांतलि एक पाकीट उचलून त्याच्यावर गुंडाळलेला कागद सोडला व चॉकोलेटचा तुकडा मोडून खात म्हणाला ' वा: ! हें शिंचं भलतंच काम आहे. फारच छान चॉकलेट आहे. तें खायचा मोह मलासुद्धां आवरला नाहीं. बरं पण, हंटर याबद्दल खरोखरच तुला काय वाटतं ? '

' मघां जें म्हटलं तेंच. हें फार स्वस्त आहे. याला झांकण व एक मिनिटाचा फ्यूज आहे. लहानसहान कामाला याचा उत्कृष्ट उपयोग होईल, पण याचा उपयोग कसा करावया हें मात्र माहिती असायला हवं. नाहींतर हें फुकट आहे. '

लॅन्सरनं कागदाच्या आंतल्या बाजूच्या मजकुराकडे पहात म्हटलं– ' पण हें वाचलंत का ? '

' मी नुसती नजर फिरवलीय्. वाचलं नाहीं. ' हंटर म्हणाला.

' बरं, तर मग मी हें वाचलंय् व तुम्हीं काळजीपूर्वक ऐकावं असं मला वाटतं. ' लॅन्सर म्हणाला. तो कागदावरील मजकूर वाचूं लागला. " जिंकल्या गेलेल्या जनतेस–हें लपवून ठेवा. स्वत: पकडले जाऊं नका. याची तुम्हांला नंतर जरूर लागेल. तुम्हांला तुमच्या मित्रांनीं पाठविलेलें व तुम्हीं स्वारीवाल्यांना द्यावयाचं असं हें बक्षीस आहे. याचा उपयोग मोठमोठ्या कामासाठीं करूं नका. " तो भराभर मजकुरांतला मधला मधला भाग वाचूं लागला. " रूळ–रात्रीं काम करा. वाहतूक अडवा. या पहा सूचना:–रेल्वेचे रूळ: सांध्याच्याखालीं अगदीं जवळ ठेवा व घट्ट बांधा. त्याच्याभोवतीं

चिखल किंवा बर्फ लिंपून ठेवा म्हणजे घट्ट बसेल; फ्यूज पेटविल्यावर, सावकाश साठ अंक मोजल्यानंतर स्फोट होतो."

त्यानं हंटरकडे पाहिलं. हंटर एवढंच म्हणाला. "याचा उपयोग होतो. लॅन्सरनं पुनः कागदावरून भराभर वाचायला सुरुवात केली. "पूल—खिळखिळे करा, उडवूं नका. ट्रान्समिशन पोल्स." आणि हें पहा, "बंधारे ट्रक्स" त्यानं निळा कागद खालीं ठेवीत म्हटलं "हं, असं आहे."

लॉफ्ट रागावून म्हणतो. "आपण केलंच पाहिजे कांहीं तरी. त्याला आळा घालण्याचा मार्ग काढलाच पाहिजे. बरं, हेडक्वार्टर्स–(मुख्ये कचेरी) काय म्हणते?"

लॅन्सरचे ओंठ जुळले गेले. तो एका नळीशीं चाळा करीत म्हणाला. "तें कांहींएक म्हणायच्या पूर्वीच, ते काय म्हणाले असते, हें मी सांगूं शकलों असतों. हुकूम असा आलाय् कीं, बूबीट्रॅप्स (पिंजरे) लावा व चॉकोलेटांत विष घाला–क्षणभर थांबून तो म्हणाला. "हंटर, मी चांगला निष्ठावंत, इमानी आहे पण हेडक्वार्टर्सच्या (मुख्य कचेरीच्या) अचाट कल्पना पाहिल्या कीं मला वाटतं कीं मी म्हातारा जखमी नागरिक असतों तर बरं झालं असतं. बेअकली लोकांशी आपण मुकाबला करीत आहोंत, अशी त्यांची नेहमीं समजूत असते. हें त्यांच्या बुद्धिमत्तेचें लक्षण आहे असं नाहीं मला वाटत."

हंटरला गंमत वाटून त्यानं विचारलं "तुम्हाला काय वाटतं?"

लॅन्सर तिखट सुरांत म्हणाला. "नाहीं. मला नाहीं वाटत. पण या हुकुमाचा परिणाम काय होईल? एकादा माणूस हें पाकीट उचलायला म्हणून जाईल व पिंजऱ्यांत सांपडून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडतील. एकादं मूल चॉकोलेट खाईल व स्ट्रिक्नि विषानं मरेल. आणि नंतर?" त्यानं आपल्या हातांकडे पाहिलं. "लोक पाकीटांना हात लावणार नाहींत. लांब लांब काठ्यांनीं ढोसतील, दोऱ्याच्या फांसांनीं ओढतील व मग हात लावतील. चॉकोलेट पहिल्या प्रथम मांजरांना खायाला घालतील. च् च् च्! हें अकलवंत

लोक आहेत. नुसते पिंजरे लावून काम भागणार नाहीं. फार तर एकदां पिंजऱ्यांत सांपडतील पण दुसऱ्या वेळीं निसटतील."

लॉफ्ट घसा साफ करून म्हणाला. "सर, हें पराभववादी बोलणं आहे. आपण कांहींतरी केलंच पाहिजे. या वस्तू इथंच कां टाकण्यांत आल्या ? काय वाटतं तुम्हांला ?"

लॅन्सर म्हणाला. "मला वाटतं त्याला या दोनपैकीं एक कारण आहे. एक म्हणजे त्या अगदीं सहज शहरावर टाकण्यांत आल्या व दुसरं म्हणजे, या शहराचा व बाहेरचा कांहीतरी संबध आहे. इथले कांही तरुण निसटले आहेत हें आपल्याला ठाऊक आहे."

लॉफ्ट पुनः म्हणाला. "सर, आपण केलंच पाहिजे कांहीतरी." लॅन्सर त्याच्याकडे वळून म्हणाला. "लॉफ्ट, मला वाटतं तुझी जनरल स्टाफसाठीं शिफारस केली पाहिजे. प्रश्न काय आहे, तो नीट समजावून घ्यायच्या आधींच, तुला कामाला लागायची घाई सुटली आहे. ही स्वारी नव्या प्रकारची आहे. यापूर्वी लोकांना निःशस्त्र करून अशांनांत ठेवणं, शक्य होतं. आतां लोक रेडियो ऐकतात व आपण त्यांना अडवू शकत नाहीं. आपल्याला त्यांच्या रेडियोचा सुद्धां थांगपत्ता लागत नाहीं." शिपायानं दारांतून डोकावून पहात म्हटलं. "सर, मि. कोरेल तुम्हांला भेटायला आलाय्" लॅन्सर म्हणाला. "अच्छा त्याला थांबायला सांग." त्यांनीं लॉफ्टशीं बोलणं चालू केलं, "ते हस्तपत्रिका वाचतात; त्यांच्यासाठीं आकाशांतून शस्त्रास्त्रं टाकण्यांत येतात. कॅप्टन, सध्यां फक्त डायनामीटच टाकण्यांत आलं आहे, पण लवकरच ग्रेनेड (हात बॉंब) व शेवटीं विष टाकण्यांत येईल."

लॉफ्ट घाबरून उद्‌गारला. "पण अजून त्यांनीं विष टाकलं नाहीं."

"अजून नाहीं टाकलं, पण टाकतील. कॅप्टन समजा उद्यां विमानांतून लहान लहान तीर टाकण्यांत आले. मुलांच्या खेळांतल्या सारखे छोटे फेंकायचे तीर ! त्याची टोंक सायनाईडमध्यें (विषामध्यें) बुडवलेलीं असलीं तर ? अगदीं लहान असतात ते, तुमच्या अंगावर कुणी फेंकले तरी बिलकुल आवाज यायचा नाहीं. युनिफॉर्मात अडकून बसतील, आणि अग्नि-

निक ( विष ) असल्यानं त्याचा हुकमी घातुक परिणाम होईल. हें जर आपल्या लोकांना किंवा तुला समजलं तर मनोधैर्यावर त्याचा काय परिणाम होईल ? आपले लोक किंवा तू निःशंक मनानं खालप्याल का ? ”

इंटरनं विचारलं. “ कर्नलसाहेब, शत्रूची मोहीम आंखतां वाटतं ? ”

“ नाहीं. तें काय करतील यांचा मी अंदाज करतोंय्. ”

लॉफ्ट म्हणाला. “ सर, आपण इथं बोलत बसलों आहोंत, खरं म्हटलं तर लगेच डायनामीट शोधायला लागलं पाहिजे. या लोकांत जर एकादी संघटना असेल तर तिचा तलास लावून, तिचीं पाळंमुळं उपटून काढलीं पाहिजेत. ”

“ हं. मला अत्यंत निष्ठुरपणं हें काम करायला लागेल नाहीं कॅप्टन ? अच्छा, लॉफ्ट तूं एक तुकडी घेऊन चल. प्रॅकलला घ्यायला लाव. आणखी ज्युनिअर ऑफिसर्स (हाताखालचे छोटे अधिकारी) असते तर मला वाटतं बरं झालं असतं. टॉडरच्या खुनानं आपला काडीचा फायदा झाला नाहीं. तो बायकोच्या वाटेला कशाला गेला कुणास कळे ? ”

लॉफ्ट म्हणाला. “सर, लेफ्टनंट प्रॅकलची वर्तणूक मला पसंत नाहीं. ”

“ कां ? काय करतो तो ? ”

“ कांहीं करीत नाहीं, पण भेदरलाय व नेहमीं विषण्ण असतो. ”

“ हं, ते मला ठाऊक आहे. मी या विषयावर कितींदा तरी बोललोंय. तुला माहीत आहे, हें जर मी बोललों नसतो, तर कदाचित आज मी मेजर-जनरल झालों असतों. आम्हीं आमच्या तरुणांना विजय मिळविल्यावर कसं वागायचं याचं शिक्षण दिलंय्-व विजय मिळविल्यानंतर ते उत्तम वागतात हें कबूल करायला पाहिजे. पण पराभवानंतर कसं वागायचं हें त्यांना समजत नाहीं. इतर तरुणांपेक्षां तुम्हीं चलाख व शूर आहांत, असं आम्हीं त्यांना सांगितलं. पण इतर तरुणांपेक्षां आपण यत्किंचितही अधिक चलाख किंवा शूर नाहीं, हें आढळल्यावर त्यांना धक्का बसला. ”

लॉफ्टनं कर्कश सुरांत विचारलं. “ पराभव पराभव म्हणजे काय ? आपला पराभव झालेला नाहीं. ”

लॅन्सरनं थंडपणं त्याच्याकडे कितीतरी वेळ पाहिलं पण तो कांहीएक बोलला नाहीं. शेवटीं आपण काय बोललों असं वाटून लॉफ्टची नजर थरथरली व तो एवढंच म्हणाला. " सर. "

" थँक यू. " लॅन्सर म्हणाला.

" दुसऱ्या कुणापासून तुम्हीं याची (अपमान केल्याबद्दलच्या माफीची) अपेक्षा कां करीत नाहीं ? "

" आपण अपमान केला हें त्यांच्या ध्यानांतच येत नाहीं, मग तो अपमान कसला ? पण जाणूनबुजून गोष्ट केली म्हणजे तो अपमान होतो. "

" यस् सर, " लॉफ्ट म्हणाला.

" बरं आतां जा व प्रॅकलला संभाळ. शोध सुरू कर. उघड कृत्य झाल्याखेरीज, कुणाला गोळी घालतां कामा नये, आलं लक्ष्यांत ? "

" यस सर " म्हणून व सलाम करून लॉफ्ट बाहेर निघून गेला.

हंटरनं लॅन्सरकडे पहात विचारलं. " तुम्हीं त्याच्याशीं जरा कठोरपणं वागलांत, असं नाहीं तुम्हांला वाटत ? "

" वागायलाच लागलं मला. तो टरकला. असले लोक मला माहीत आहेत. हा घाबरलेला असतांनांच याला शिस्त लावली पाहिजे. नाहीं तर हा फुकट जायचा. इतर लोक सहानुभूतीवर जसे अवलंबून रहातात तसा हा शिस्तीवर अवलंबून राहाणारा आहे. बरं, मला वाटतं तूं आतां रेल दुरुस्तीच्या तजविजीला लाग मला वाटतं आज रात्रीं ते खरोखरच रूळ उखडवून टाकतील. "

हंटर उठून उभा रहात म्हणाला. " मला वाटतं, राजधानीहून हुकूम येणार असतील ? "

" हं. "

" ते— "

" ते काय आहेत हें तुला ठाऊक आहे. " लॅन्सर त्याचं वाक्य पुरं होण्याच्या आंतच म्हणाला " हुकूम कसे असले पाहिजेत हें सांगतां येतं. पुढाऱ्यांना पकडा, त्यांना गोळया घाला, माणसं ओलिस ठेवा, त्यांना गोळ्या

घाला, पुनः ओलिस ठेवा, पुनः त्यांना गोळया घाला.—" त्याचा आवाज चढला होता पण आतां तो अगदीं खालीं उतरला—तो मऊ स्वरांत म्हणतो. "द्वेष वाढत चाललाय् व आमच्यांतलं अंतर दुरावत आहे."

"हंटर गुटमळला." नांवाच्या यादीपैकीं कुणाला देहांतशासन देण्यांत आलं आहे का ?" त्यानं मेयरच्या बेडरूमकडे पाहून विचारले.

लॅन्सरनं मान हलविली. "नाहीं. अजून त्यांना नुसतं पकडून ठेवण्यांत आलं आहे." हंटर शांतपणं म्हणाला. "कर्नल, मी तुमच्यासाठीं शिफारस करू का ? तुम्हीं कामाखालीं दडपून गेलेले दिसतां. तुम्हीं श्रमामुळं फारच खचून गेलांत, असा मी रिपोर्ट करूं का ?"

क्षणमात्र लॅन्सरनं हातानं डोळे झाकले व नतर खांदे रुंदावले व त्याची मुद्रा उग्र दिसूं लागली. "हंटर, मी साधा नागरिक नाहीं. सध्यांच आपल्याला ऑफिसर्सची उणीव भासत आहे, हें तुला ठाऊक आहे. बरं मेजर कामाला लाग. मला कोरेलला भेटायचं आहे."

हंटरनं स्मित केलं दारापाशीं जाऊन, दार उघडून तो म्हणाला. "हा इथं आहे," व त्याच्या खांद्यावरून पहात लॅन्सरला म्हणाला. "हा प्रॅकल आहे. त्याला भेटायचं आहे तुम्हाला."

"आंत पाठवा त्याला." लॅन्सर म्हणाला.

प्रॅकल आंत आला. त्याच्या तोंडावर चिडखोरपणा व तिरस्कार उमटला होता. "कर्नल लॅन्सर, मला असं सांगायचंय् कीं—"

"खालीं बस." लॅन्सर म्हणाला. "खालीं बस व क्षणभर विश्रांति घे. लेफ्टनंट चांगल्या शिपायासारखा वाग पाहूं."

तावडतोब प्रॅकलचा ताठरपणा कुठच्या कुठं विरून गेला. तो टेबला-जवळ बसला व आपलीं कोपरं त्यानं टेबलावर टेकलीं. "मला असं सांगायचंय."

लॅन्सरनं बजावलं. "क्षणभर एक अक्षर बोलूं नकोस ! काय झालंय् तें मला ठाऊक आहे. असं होईल असं तुला वाटलं नव्हतं नाहीं ? इथं मजा असेल असंच वाटलं ना तुला."

" ते आमचा द्वेष करतात. " प्रॅकल म्हणाला. " इतका द्वेष करतात. "

लॅन्सर हंसला. " काय झालंय हें मला ठाऊक आहे कीं नाहीं सांगता येत नाहीं. तरुणच चांगले शिपाई होतात, पण तरुणांना तरुणींची जरूर असते, असंच कीं नाहीं ? "

" हं तसंच. "

" बरं. " लॅन्सरनं दयाळूपणानं विचारलं. "द्वेष करते का ती तुझा ?"

प्रॅकलनं त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहिलं. "सर, मला ठाऊक नाहीं. मला वाटतं कधीं कधीं तिला फक्त दुःख वाटतं."

" आणि तूंसुद्धां बराच दुःखी आहेस ? "

" मला इथं बरं नाहीं वाटत सर. "

" तुला वाटत इथं मजा असेल नाहीं ? लेफ्टनंट टॉंडरचं डोकं फिरलं व शेवटीं त्यांनी त्याला भोसकलं. मी तुला घरीं पाठवूं शकतों. इथं आम्हाला तुझी जरूरी आहे, अशा वेळीं तुझ्या मनांतून घरीं जायचंय का ? "

प्रॅकलला कससंच वाटलं. " नाहीं सर. मला जायचं नाहीं. "

" अच्छा. मी आतां सांगतों तें मला वाटतं, तुला समजेल. लेफ्टनंट प्रॅकल, तूं आतां माणूस राहिला नाहींस तूं शिपाई आहेस तुझ्या सुखाला काडीची किंमत नाहीं, आणि लेफ्टनंट, तुझ्या प्राणालाही फारसं महत्व नाही. जगला वांचलास तर तुला आठवणी येतील. तेवढंच काय तें तुला मिळेल. दरम्यान, तूं हुकूम ऐकला पाहिजे व बजावला पाहिजे पुष्कळसे हुकूम कटु असतील. पण तो तुझा प्रश्न नाहीं. लेफ्टनंट, मी खोटं बोलत नाहीं, पण या प्रसंगीं कसं वागायचं, याचं त्यांनी तुला शिक्षण द्यायाला हवं होतं. नुसतं फुलांची वृष्टि होत आहे अशा रस्त्यांतून थाटानं चालण्याचं शिक्षण पुरेसे नाहीं. त्यांनी तुझ्या आत्म्याची बैठक सत्यावर-खोट्यावर नव्हे उभारायला हवी होती." त्याचा आवाज कठोर बनला. पण लेफ्टनंट, तूं नोकरी पत्करलीस. मग तूं आतां ती टिकविणार कीं सोडणार ? तुझ्या आत्म्याची काळजी घेणं आम्हाला शक्य नाहीं. "

प्रॅकल उठून म्हणाला. " थॅंक यू सर. "

" आणि त्या पोरीविषयीं—" लॅन्सर बोलूं लागला. " तूं तिच्यावर अत्याचार कर, तिचं रक्षण कर किंवा तिच्याशीं लग्न कर—त्याला कांहीं महत्व नाहीं—पण हुकूम दिल्याबरोबर तूं तिच्यावर गोळी झाडलीस कीं झालं. "

प्रकल कंटाळून म्हणाला. " यस सर, थँक यू सर. "

" माहीत असलेलं बरं, हें ध्यानांत ठेव. माझे शद्ब ध्यानांत ठेव, विसरूं नको. माहीत असलेलं चांगलं अच्छा लेफ्टनंट जा आतां, नि बाहेर कोरेल जर अजून उभा असेल तर त्याला आंत पाठव." लेफ्टनंट प्रॅकल दारांतून बाहेर पडेपर्यंत तो त्याच्याकडे लक्षपूर्वक पहात होता.

मि. कोरेल आंत आला. तो साफ बदललेला दिसत होता. त्याचा डावा हात प्लास्टरमध्यें असून त्याच्या तोंडावर नेहमीचं हास्य दिसत नव्हतं. त्याचं तोंड उदास व कडवट दिसत होतं डोळे मेलेल्या डुकराच्या पोराप्रमाणं तिरळे दिसत होते.

" कर्नल, मी याच्या आधींच यायला हवं होतं, पण तुमच्या असहकारामुळं यावं का नाहीं असं मला वाटलं. "

लॅन्सर म्हणाला. " मला आठवतं, तूं तुझ्या रिपोर्टाच्या उत्तराची वाट पहात होतास." "मी त्याहीपेक्षां आणखी कितीतरी गोष्टीची वाट पहात होतों. तुम्हीं मला अधिकाराची जागा देण्याचं नाकारलंत. मीं मातीमोल आहे असं तुम्ही म्हणाल़ांत. पण तुम्हीं यायच्या आधीं कित्येक वर्षे मी या शहरांत राहात आहे ही गोष्ट तुम्हांला समजली नाहीं. माझ्या सल्ल्याविरूद्ध तुम्हीं मेयरला आपल्या जागेवर तसंच राहूं दिलांत. "

" तो जर इथं नसता तर आहे यापेक्षां अधिक गडबड उडाली असती " लॅन्सर म्हणाला.

" हें तुमचं मत झालं. हा मेयर बंडखोर जनतेचा पुढारी आहे. "

" छट्. तो अगदीं साधा माणूस आहे. "

कोरेलनं उजव्या हातानं खिशांतली काळी वही काढली व बोटांनीं उघडली. " कर्नल, तुम्हीं विसरतां, कीं इथं मी तुमच्या आधीं राहात

आलेला आहे, बातमी काढण्याचे माझे मार्ग आहेत. मेयर ऑर्डन हा इथल्या बंडखोर लोकांशी सारखा संबंध ठेवीत आहे व प्रत्येक कृत्यांत याचा संबंध आहे असा मला तुम्हाला रिपोर्ट द्यावयाचा आहे. ज्या रात्रीं लेफ्टनंट टॉडरचा खून झाला, त्या रात्रीं मेयर त्या घरांत होता ती मुलगी जेव्हां टेंकड्यांत निसटून गेली तेव्हां याच्या एका नातेवाईकाबरोबर राहात होती. मी तिचा तिथपर्यंत तलास लावला, पण ती निसटली. जेव्हां माणसं निसटलीं, तेव्हां ऑर्डनला त्याची माहिती होती व त्यानं त्यांना मदत केलेली आहे, आणि मला असा दाट संशय आहे कीं या छोट्या छाप्यांच्या प्रकरणांत त्याचा हात असला पाहिजे. ”

लॅन्सर औत्सुक्यानं म्हणाला. “पण तें तुला सिद्ध करतां येणं शक्य नाहीं.”

“ नाहीं ” कोरेल म्हणाला “मला तें सिद्ध करणं शक्य नाहीं. पहिली गोष्ट मला माहीत आहे व दुसरीचा मला संशय येतो आहे मला वाटतं, आतां कदाचित, तुम्हीं माझं म्हणणं ऐकून काल “ लॅन्सरनं शांतपणं विचारलं तुला काय सुचवायचंय ? ”

“ कर्नल या नुसत्या सूचना नाहींत, सूचनापेक्षां थोड्या कडक आहेत. आर्डनला आतां ओलिस ठेवलं पाहिजे व त्याचे प्राण लोकांच्या शांततेवर अवलंबून राहिले पाहिजेत. डायनामीटरच्या एका कांडीच्या. एका फ्यूज पेटविण्यावर त्याचे प्राण अवलंबून राहिले पाहिजेत. ”

त्यानं पुनः खिशांत हात घालून, एक वही काढली व ती उघडून कर्नल पुढं ठेवली.

“ माझ्या रिपोर्टाचं हेडक्वार्टर्सहून (मुख्य कचेरींतून) आलेलें हें उत्तर. मला कांहीं अधिकार देण्यांत आले आहेत हें यावरून तुमच्या लक्षांत येईल. ”

लॅन्सरनं त्या छोट्या पुस्तकाकडे पहात, सावकाशपणं म्हटलं. “ शेवटीं तूं मला डावलून मुख्य कचेरीपर्यंत गेलास नाहीं कां ? ” कोरेलकडे पहातांना त्याच्या नजरेंत स्वच्छपणं तिरस्कार भरलेला दिसत होता. “ तूं जखमी झाला होतास असं मी ऐकलं कशी काय जखम झाली ? ” कोरेल सांगूं लागला. “ज्या रात्रीं तुमच्या लेफ्टनंटचा खून झाला, त्या रात्रीं दबा धरून

बसलेल्या लोकांनीं माझ्यावर हल्ला केला. पण पहारेकऱ्यांनीं मला वाचविलं. कांहीं नागरिक माझ्या होडींत बसून त्या रात्रीं पसार झाले. कर्नलसाहेब, मेयर ऑर्डनला ओलिस ठेवण्यांत यावं, हें मी अधिक स्पष्टपणं सांगण्याची कांहीं जरूरी आहे का ? ”

लॅन्सर म्हणाला. “ मेयर ऑर्डन इथं आहे. तो पळाला नाहीं. यापेक्षां त्याला अधिक ओलिस कसा ठेवायचा ? ”

इतक्यांत, दूरवर एकदम स्फोट झाल्याचा आवाज झाला. दोघांनींही वळून आवाज ज्या दिशेनं आला तिकडे पाहिलं. कोरेल म्हणाला. “ हें घ्या कर्नल साहेब, हा जर प्रयोग यशस्वी झाला तर स्वारी केलेल्या प्रत्येक देशांत डायनामीट पडेल हें तुम्हांला ठाऊक आहे ? ”

लॅन्सरनं शांतपण पुनः विचारलं. “ मग तुला काय सुचवाचंय ? ”

“ मी जें सांगितलं तेंच. बंडाबाबत ऑर्डनला धरलं पाहिजे. ”

“ समजा बंडखोरांनी उठाव केला व आम्ही ऑर्डनला गोळी घातली तर मग ? ”

“ नंतर तो ठेंगणा डॉक्टर. त्याला जरी कांहीं अधिकार नसला, तरी शहरांत त्याचं वजन आहे. ”

“ पण तो अधिकारी नाहीं. ”

“ पण जनतेचा त्याच्यावर विश्वास आहे. ”

“ बरं, त्याला पण आम्ही गोळी घातली, मग पुढं काय ? ’

“ मग आपल्याला अधिकार प्राप्त झाला. नंतर बंडाचं कंबरडं मोडण्यांत येईल. पुढाऱ्यांना ठार मारलं कीं बंडाचा बीमोड झाला. ”

लॅन्सरनं उपरोधिकपणं विचारलं. “खरोखरचं का तुला असं वाटतं ?”

“ असंच झालं पाहिजे. ’

लॅन्सरनं मान हलविली व नंतर हांक मारली. “पहारेकरी !” दार उघडलं गेलं व शिपाई दारांत उभा राहिला. “ सार्जंट, ” लॅन्सर म्हणाला. मी मेयर ऑर्डनला व डॉक्टर विंटरला पकडून अटकेंत ठेवलंय. ऑर्डनवर पहारा ठेव. विंटरला इथं तावडतोब घेऊन ये. ”

" यस सर " म्हणून पहारेकरी निघून गेला.

लॅन्सर कोरेलकडे पाहून म्हणाला. " तूं काय करीत आहेस हें तुझं तुला समजत आहे असं मला वाटतं. खरोखरच तूं काय चालविलं आहेस हें तुझं तुला समजो अशी माझी इच्छा आहे. "

त्या लहानशा शहरांत बातमी वेगानं पसरली. दाराच्या फटींतून दबक्या आवाजांत, नेत्रपल्लवीनं, अर्थपूर्ण दृष्टीनं— " मेयरला अटक झाली आहे " —ही बातमी पसरली. लोकांत एक तेजस्वी आनंद चमकूं लागला. लोकांचे लहान लहान थवे जमून आपसांत बोलूं लागले. धान्य विकत घ्यायला गेलेले लोक दुकनांत पुढं वाकून क्षणमात्र कारकुनांच्या कानांना लागले, व अशा रितीनें बातमी पसरली.

लोक जंगलांत, शहराच्या आसपास डायनामीटच्या शोधांत गेले. बर्फांत खेळणाऱ्या मुलांना डायनामीट सांपडलं—आतां मुलांना सुद्धां सूचना मिळाल्या होत्या. त्यांनी पाकीटं उघडून चॉकोलेट खाऊन टाकलं व डायनामीट बर्फांत पुरलं व घरीं येऊन, कुठं पुरलंय तें आईबापांना सांगितलं.

शहरापासून दूरवर एकाला डायनामीटची नळी सांपडली. त्यानं सूचना वाचल्या व स्वतःशीं म्हणाला, " हें चालू आहे की काय कुणास ठाऊक. " त्यानं नळी बर्फांत उभी केली. फ्यूज पेटविली व दूर धांवत जाऊन अंक मोजूं लागला. पण तो अंक जलद मोजीत होता. अडसष्टाव्या अंकाच्या वेळीं स्फोट झाला. " चालू आहे म्हणजे ! " असं म्हणून तो लगेच आणखी नळ्या शोधायला गेला.

जणूं कांही इशारा दिल्याप्रमाणं लोक घरांत गेले, दारं बंद झालीं व रस्ते ओसाड दिसूं लागले. खाणीजवळील शिपायांनी खाणींत जाणाऱ्या प्रत्येक खाणकामगाराची कसून झडती घेतली, पुनः पुन्हां तपासणी केली, डोबटीं शिपाई मेटाकटीस येऊन खाणकामगारांना तोंडास येईल तें बोलूं लागले. कामगारांनी त्यांच्याकडे थंडपणानं पाहिलं, पण त्यांच्या नजरेंत तेजस्वी आनंदाची प्रखर ज्योत चमकत होती.

मेयरच्या राजवाड्यात, दिवाणखान्यातील टेबल साफ करण्यांत आलं होतं. मेयरच्या बेडरूमपाशीं संत्री पहारेकरी उभा होता. कोळशाच्या शेगडी समोर ॲनी गुडघे टेंकून विस्तवावर कोळशाचे तुकडे टाकीत होती. तिनं मेयरच्या बेडरूमपाशीं उभा असलेल्या शिपायाला दरडावून विचारलं. " कायरे, मेयरचं तुम्हीं काय करणार आहांत ? " शिपायानं उत्तर दिलं नाहीं. बाहेरचं दार उघडलं व दुसरा शिपाई आंत आला त्यानं डॉक्टर विंटरच्या दंडाला धरलं होतं. त्यानं दार बंद केलं व आंतील दरवाज्यासमोर उभा राहिला. डॉक्टर विंटर उद्गारला. "हेलो, ॲनी, मेयरची तब्येत कशी काय आहे ?"

ॲनीनं बेडरूमकडे बोट दाखवीत म्हटलं. " आंत आहेत. "

" आजारी नाहींना ? " डाक्टर विंटरनं प्रश्न केला.

" नाहीं. तसं कांही दिसलं नाहीं. " ॲनी म्हणाली. " तुम्ही इथं आहांत हें त्यांना सांगतां येतं का पाहतें. " ती शिपायाजवळ जाऊन हुकमी आवाजांत म्हणाली." आंत जाऊन मेयरसाहेबांना सांग, डॉक्टर विंटर आले आहेत. ऐकूं आलं कीं नाहीं ? "

शिपायानं उत्तर दिलं नाहीं कीं जागचा हालला नाहीं, पण त्याच्या मागचं दार उघडलं गेलं व मेयर दारांत उभा राहिला. त्यानं शिपायाकडे लक्ष न देतां त्याला बाजूला सारून खोलींत पाऊल टाकलं. क्षणभर शिपायाला वाटलं कीं मेयरला मागं ओढून न्यावं, पण नंतर तो आपल्या जागेवर येऊन उभा राहिला. आर्डन म्हणाला. " थँक्यू ॲनी. फार दूर जाऊं नको समजलं. मला तुझी जरूरी लागेल. "

ॲनी म्हणाली. " नाहीं, मी जाणार नाहीं. मादाम ठीक आहे ? "

" ती वेणी घालते आहे. ॲनी तिला भेटायचंय तुला ? "

" होय. " म्हणून ॲनीसुद्धां शिपायापुढून बेडरूममध्यें गेली व तिनं दार लावून घेतलं. ऑर्डननं विचारलं. " डॉक्टर, तुला कांही हवंय का ?"

विंटर उपरोधिकपणं स्मित करीत व शिपायाकडे बोट दाखवीत म्हणाला. " मला वाटतं, मला अटक करण्यांत आली आहे. हा माझा मित्र मला इथं घेऊन आला. "

ऑर्डन म्हणाला. " मला वाटतं अटक केव्हांतरी होणारच होती. आतां काय करणार आहेत कुणास ठाऊक ? " दोघंजण एकमेकांच्या तोंडाकडे कितीतरी वेळ पहात होते. दुसऱ्याच्या मनांत काय विचार चालले आहेत हें एकमेकांना कळत होतं.

आपण इतका वेळ बोलत असून तेंच पुढं चालवीत आहोंत अशा तऱ्हेनं ऑर्डन म्हणाला. " माझ्या जरी मनांत आलं असतं, तरी मला तें थांबवितां येणं शक्य नव्हतं, ठाऊक आहे तुला ? "

" मला ठाऊक आहे, पण त्यांना ठाऊक नाहीं. " विंटर म्हणाला. आपल्या मनांतील विचारांना तोंड फोडीत तो म्हणाला. " हे मोठे वक्तशीर लोक आहेत, पण आतां घटका भरत आली आहे. आपला एक पुढारी आहे म्हणून आम्हीसुद्धां तसेंच आहोंत असं त्यांना वाटतं. त्यांच्यातल्या दहा पुढाऱ्यांची डोकीं उडविलीं कीं त्याचा नाश ठेवलेला आहे, हें त्यांना कळतं; पण आपण स्वतंत्र लोक आहोंत. आमच्यांतील प्रत्येक व्यक्तिला डोकं आहे व अडचणीच्या प्रसंगी आमच्यांत असंख्य पुढारी निर्माण होतात. "

ऑर्डननं विंटरच्या खांद्यावर हात ठेवून म्हटलं. " थँक यू. मला हें ठाऊक होतं. पण तुझ्या तोंडून हें ऐकतांना मला बरं वाटतं. आपले लोक वांकणार नाहींत, नाहीं ? " त्यानं विंटरची मुद्रा सूक्ष्मपणं न्याहाळली.

डॉक्टरनं त्याला आश्वासन दिलं. " कां; नाहीं ते कधीही शत्रूपुढं मान वांकविणार नाहींत, बाहेरच्या मदतीमुळं ते अधिक प्रबळ होतील.

थोडावेळ खोलीत शांतता पसरली. शिपायनं आपला पवित्रा बदल्यानं त्यांना त्याची रायफल बटणावर वाजून आवाज झाला.

ऑर्डन म्हणाला. " डॉक्टर, आतां मी तुझ्याशीं बोलूं शकतों, बहुतेक पुनः मला बोलायला मिळणार नाहीं. माझ्या मनांत लहानसहान लज्जास्पद विचार आहेत. " तो खोकला व त्याची नजर पहारा करणाऱ्या शिपायाकडे वळली, पण शिपायानं आपण कांहींच ऐकलं नाहीं असं दर्शविलं " मी माझ्या मरणाचा विचार करीत आहे. त्यांच्या नेहमीच्या खाक्याप्रमाणं, त्याम्हीं

मला ठार मारलं पाहिजे, तुला ठार मारलं पाहिजे." विंटर स्तब्ध होता, ऑर्डननं विचारलं. " नाहीं कां ?"

" हं, असं वाटतं मला." डॉक्टर मढविलेल्या खुर्चीपाशीं गेला व बसणार तोंच वरच उंची आच्छादन त्याला फाटल्यासारखं दिसलं, त्यानं खुर्ची थोपटली. जणूं कांही थोपटण्यानं ती दुरुस्त होणार होती. खुर्चीच आच्छादन फाटलं असल्याकारणानें पुन: तो हलकेच बसला.

आर्डन बोलूं लागला. "तुला ठाऊक आहे, मी घाबरलोंय्, मी निसटून जायचा विचार करतोंय्, या संकटांतून बाहेर पडण्याच्या खटपटींत आहे. मी पळून जायचा विचार करीत आहे. मला जीवदान द्या अशी विनवणी करण्याचा विचार करतोंय् पण त्याची मला शरम वाटते."

विंटर वर बघून म्हणाला. " पण तूं विनवणी केली नाहींस ना ?"

" नाहीं."

" आणि करणार नाहींस."

आर्डन घुटमळला. " नाहीं मी करणार नाहीं. पण मी त्याचा विचार केला."

विंटर हलकेच म्हणाला. " प्रत्येकजण त्याचा विचार करीत नाहीं हें कशावरून ?

मीं त्याचा विचार करीत नाहीं हें कशावरून ?"

ऑर्डन म्हणाला. " त्यांनी तुलासुद्धां कां अटक केली, कळत नाहीं. मला वाटतं तुलासुद्धां त्यांना ठार मारावं लागेल."

" मलाही तसं वाटतं." विंटर म्हणाला. तो आपले आंगठे फिरवीत त्यांच्याकडे पाहूं लागला.

" तुला असं ठाऊक आहे." ऑर्डन थोडा वेळ थांबून म्हणाला. " डॉक्टर, मी लहानसा माणूस आहे. हें शहर लहान आहे, पण लहान माणसांतसुद्धां अशी कांही ठिणगी असली पाहिजे की जी भडकून डोंब उसळतो. मी घाबरलोंय्, कमालीचा घाबरलोंय्, प्राण वांचविण्यासाठीं काय काय करावं या सगळ्याचा मी विचार केलाय्; पण नंतर ते विचार निघून

गेले व आतां मधून मधून, माझ्या हृदयांत नवीनच आनंदाची उर्मी उसळते, व मी मोठा अधिक चांगला आहे, असं मला वाटतं. डॉक्टर, मी कसला विचार करीत आहे ठाऊक आहे ?" त्याला विचाराची आठवण होऊन त्याच्या तोंडावर स्मित झळकलं. "आपण शाळेंत असतांना" ॲपॉलोजी "नांवाचा धडा होता आठवतं तुला ? सॉक्रेटिस काय म्हणतो—आठवतं का तुला—" कुणी असं म्हणेल—" सॉक्रेटिस, अकालीं अंत ओढवून आणणाऱ्या मार्गाची, तुला लाज नाहीं का वाटतं ?" त्याला मी असं उत्तर देईन; इथं तुझी चुकी होते आहे. चांगल्या माणसानं जगण्याचा वा मरणाचा, तुलनात्मक विचारच करूं नये हें बरं. आपण करतों तें चूक कीं बरोबर एवढाच विचार करावा ऑर्डन आठवायसाठीं थांबला.

डॉक्टर विंटर गंभीरपणं ऐकत होता. तो सॉक्रेटिसचं भाषण पुढं पाठ म्हणून दाखवूं लागला. "आपण चांगल्या माणसाप्रमाणं वागत आहों, वाईट माणसाप्रमाणं वागत आहों"—मला वाटतं तुला भाषण बरोबर आठवत नाहीं. तूं मोठा स्कॉलर नव्हतासच. पाठ म्हणतांनासुद्धां तुझ्या चुका व्हायच्या.

ऑर्डरनं विचारलं "तुला आठवतं का ?"

"हो—" विंटर उत्सुकतेनं म्हणाला. "मला तें नीट आठवतं. तूं एकादा शब्द किंवा ओळ विसरलास. ती परीक्षेची वेळ होती आणि तूं इतका भांबावून गेलास कीं शर्टचा मागचा भाग विजारींत घालायला विसरलास व तो बाहेर लोंबत होता. ते कां हंसत होते हें त्यावेळीं तुला कळलं नाहीं."

ऑर्डन स्वतःशींच हसला व हळूच हात मागं नेऊन, शर्टाची बाजू बाहेर लोंबत आहे कीं काय हें तो चांचपून पाहूं लागला. "मी सॉक्रेटिस होतों व मी स्कूलबोर्डचा धिक्कार केला. काय धिःक्कार केलाय् मी ! शुद्ध बाबलत होतों व त्यांचे लालभडक झालेले चेहरे मला दिसत होते."

विंटर म्हणाला. "ते हंसू आवरायसाठीं श्वास कोंडून बसले होते, कारण तुझा शर्ट मागं लोंबत होता ना ?"

मेयर ऑर्डन् हंसला. "किती वर्षे झालीं बरं या गोष्टीला ? चाळीस ?"

" शेचाळीस. "

बेडरूमच्या दाराजवळचा पहारेकरी हलकेच बाहेरील दारावरच्या पहारेकऱ्यापाशीं गेला. ते आपसांत, शाळेंतील मुलं कुजबुजतात त्याप्रमाणं बोलत होते.

" किती वेळ ड्यूटीवर आहेस तूं ? "

" आख्खी रात्र. माझे डोळेसुद्धां मिटायला लागलेत. "

" माझेसुद्धां लागलेत. बरं काल बोटीवर बायको काय म्हणाली ? "

" हो. तिनं तुझी आठवण केली. तूं जखमी झालास हें तिला कळलं. ती फार पत्र लिहित नाहीं.

" मी बरा आहें म्हणून सांग तिला. "

" हो हो–मी. पत्र लिहीन तेव्हां कळवीन मी. "

मेयरनं डोकं वर करून छताकडे पहात म्हणायला सुरवात केली—" मला आठवत नाहीं–सुरवात काय आहे त्याची ? "

विंटरनं त्याला सुचविलं "–" मला देहांत शासन देणाऱ्यांनों—"

कर्नल लॅन्सर सावकाश खोलींत आला. पहारेकरी शिस्तींत उभे राहिले. मेयरचे शद्ब ऐकतांच, कर्नल थबकून ऐकूं लागला.

ऑर्डन छताकडे पाहून शद्ब आठवण्याचा प्रयत्न करूं लागला. " मला देहांत शासन देणाऱ्यांनों, मला असं भाकित करावंसं वाटतं—कारण मी मृत्यूच्या दारांत उभा आहे–नि–अखेरच्या घटकेवेळीं, माणसांच्या तोंडून भविष्यवाणी बाहेर पडते. माझा खून करणारांनों, मी असं भाकित करतों कीं माझ्या मृत्यूनंतर लगेच—"

विंटर उठून म्हणाला. " प्रयाणानंतर. "

ऑर्डननं बिचारलं. " काय ? "

विंटर म्हणाला. " भाषणांत–प्रयाण. हा शद्ब आहे, मृत्यु नाहीं. मागं तूं हीच चूक केलीस. शेचाळीस वर्षांपूर्वी तूं नेमकी हीच चूक केलीस. "

" नाहीं. " मृत्यु हाच शद्ब आहे. ऑर्डननं वळून पाहिलं तों कर्नल लॅन्सर त्यांच्याकडे पहात होता. ऑर्डननं विचारलं. " मृत्यु नाहीं का ? "

कर्नल लॅन्सर उद्गारला. " प्रयाण. " माझ्या प्रयाणानंतर लगेच— असं आहे " विंटर म्हणाला. " पहा, एका विरुद्ध आम्ही दोघे आहोंत. मूळ शब्द प्रयाण आहे. पूर्वी तूं हीच चूक केलीस. "

नंतर ऑर्डननं समोर पाहिलं. त्याला समोरचं कांहीएक दिसत नसून तो भाषण आठवत होता. " माझा खून करणाऱ्यांनों, मी भाकित करतों कीं माझ्या-प्रयाणानंतर लगेच, तुम्हांला, मला दिलीत त्याहीपेक्षां घोरतम शिक्षा खात्रीनं भोगावी लागेल. "

विंटरनं त्याला उत्साह देण्यासाठीं मान हलविली, कर्नल लॅन्सर मान हलवून त्याला जणूं आठवायला मदत करीत होता.

ऑर्डन पुढं बोलूं लागला. " आपल्या कृत्यांचा पाढा वाचायला नको. तुमच्यावर आरोप करणारांच्या तडाख्यांतून सुटावं म्हणून तुम्हीं मला ठार करीत आहा !-- "

लेफ्टनंट प्रॅकल घाईघाईनं आंत येऊन म्हणतो. " कर्नल लॅन्सर ! "

कर्नल लॅन्सरनं दटावलं. " शुः शुः " व त्याला थांबविण्यासाठीं हात वर केला.

ऑर्डन हलक्या आवाजांत बोलूं लागला. " पण तुम्हाला वाटतं तसं घडणार नाहीं, तर त्यापेक्षां अगदीं निराळंच घडेल. " त्याचा आवाज चढला. " मी असं सांगतो कीं आजच्यापेक्षां अधिकजण तुमच्यावर आरोप करतील- " भाषण करतांना हातवारे करावे त्याप्रमाणं करून तो पुढं म्हणाला. --" अजूनपर्यंत, ज्या आरोप करणारांना मी ताब्यांत ठेवलं आहे असे पुढं येतील. आणि ते वयानं तरुण असल्यामुळं तुम्हाला दयामाया दाखविणार नाहींत, आणि मग त्यांची तुम्हांला अधिक चीड येईल. " ऑर्डन आठवायचा प्रयत्न करूं लगाला.

लेफ्टनंट प्रॅकल म्हणाला. " कर्नल लॅन्सर, आम्हाला डायनामीट-जवळ असलेलीं माणसं सांपडली आहेत. "

लॅन्सरनं पुनः त्याला गप्प केलं.

ऑर्डन बोलूं लागला. " तुम्हाला जर असं वाटत असेल कीं आपण लोकांना ठार मारून आपल्या दुष्कृत्यावर कुणाला टीका करूं देणार नाहीं

तर तो तुमचा भ्रम आहे." त्यानं आठवण्याचा खूप प्रयत्न केला, छताकडे पाहिलं लज्जेनं व हंसून म्हणाला. "एवढंच मला आठवतं. बाकीचं मी विसरून गेलोंय्."

"शेंचाळीस वर्षांनंतर एवढं तुझ्या लक्ष्यांत राहीलं हें फारच छान आहे. शेंचाळीस वर्षांपूर्वी कांहीं तूं तें भाषण बिनचूक म्हणत नव्हतास."

प्रॅकल मध्येंच म्हणाला. "कर्नेल लॅन्सर, त्यांच्यापाशीं डायनामीट आहे."

"तूं त्यांना पकडलं कां?"

"होय. कॅप्टन लॉफ्ट आणि—"

लॅन्सर म्हणाला. "कॅप्टन लॉफ्टला सांग कीं त्यांच्यावर पहारा ठेवा."— पुढं होऊन तो ऑर्डनला म्हणाला. "ऑर्डन या गोष्टी थांबल्या पाहिजेत."

मेयर निराशेनं हंसून म्हणाला. "सर, त्या थांबू शकत नाहींत."

लॅन्सर कठोरपणं म्हणाला. "इथल्या लोकांच्या चांगल्या वर्तणुकासाठीं म्हणून मी तुला ओलिस ठेवून घेतलं हा माझा हुकूम आहे."

"पण त्यानं हें थांबणार नाहीं." मेयर म्हणाला. "तुम्हांला असं कळत नाहीं कीं मी जर लोकांच्या मार्गांत आलों, तर माझ्याशिवाय ते काम चालवतील."

लॅन्सरनं विचारलं. "तुला खरं काय वाटतं तें मला सांग. समजा, लोकांना असं कळलं, कीं आपण जर फ्यूज पेटवला तर मेयरला गोळी घातली जाईल–अशावेळीं ते काय करतील?"

मेयरनं नैराश्यानं डॉक्टर विंटरकडे पाहिलं. इतक्यांत बेडरूमचं दार उघडून मादाम आली. तिच्या हातांत, मेयरच्या स्थानाचं चिन्ह सोन्याची सांखळी होती. "हें विसरलास तूं." ती म्हणाली.

मेयरनं विचारलं. "काय? हं–हं." असं म्हणून त्यानं मान वांकाविली; मादामनं सांखळी त्याच्या गळयांत. घातली "थँक यू डिअर." तो म्हणाला.

मादामनं कुरकुर केली. "नेहमींच तूं विसरतोस."

मेयरनं हातातील सोन्याच्या सांखळीच्या टोंकाकडे पाहिलं. त्यावर मेयरच्या अधिकाराचं चिन्ह कोरलं होतं. लॅन्सरनं पुन्हां विचारलं, " लोक काय करतील ? "

" मला माहीत नाहीं. मला वाटतं ते फ्यूज पेटवतील. "

" समजा, पेटवूं नका म्हणून तूं सांगितलं तर ? "

विंटर म्हणाला. " कर्नल लॅन्सर, आज सकाळीं एक लहान मुलगा बर्फाचा माणूस बनवित होता. तुमचे तिघे धडधाकट शिपाई, तो आपल्या पुढाऱ्याचा पुतळा बनवितो कीं काय हें पहात होते. त्यानं हुबेहूब तुमच्या सारख्या ( हिटलर सारखा ) पुतळा तयार केला पण शिपायांनी तो मोडून टाकला.

लॅन्सरन डॉक्टरच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलं. ' समजा असं करूं नका म्हणून तुम्ही सांगितलंत तर ? '

ऑर्डेन जणूं अर्धवट झोंपेतच असल्यासारखा वाटला. त्यानं डोळे मिटून विचार करण्याचा प्रयत्न केला. तो म्हणाला " सर, मी कांही मोठा शूर माणूस नाहीं. मला वाटतं कांही झालं तरी ते फ्यूज पेटवतील. " तो अडखळत म्हणाला. " तें पेटवतील अशी माझी अपेक्षा आहे, पण मी जर त्यांना नको म्हणून सांगितलं, तर त्यांना वाईट वाटेल. "

मादामनं विचारलं. " काय चाललय् हें सगळं ? "

" क्षणभर शांत रहा–" मेयर हलकेच म्हणाला.

" पण ते पेटवतील असं तुला वाटतं ? " लॅन्सरनं पुनः खोंचून विचारलं.

मेयर अभिमानानं म्हणाला. " होय. ते पेटवतील. जगणं किंवा मरणं हें माझ्या हातांत नाहीं. पण, सर कसं वागायचं हें माझ्या हातीं आहे. मी जर त्यांना सांगितलं, लढूं नका, " " तर त्यांना आनंद होईल, व फारसा शूर नसलेल्या माझ्यानं, त्यांना थोडंसं आणखी शूर केल्यासारखं होईल. " तो हंसून म्हणाला. " हें करणं अगदीं सोपं आहे. कारण कांहीं झालं तर माझं मरण टळत नाहीं. "

लॅन्सर म्हणाला. " तूं जर " पेटवा " म्हणून सांगितलंस तर आम्हीं त्यांना असं सांगूं कीं तूं " नको " म्हणालास. तूं जीवदानाची याचना केलीस असं आम्हीं त्यांना सांगूं शकूं. "

डॉक्टर विंटर रागावून म्हणाला. " त्यांना कळेल. तुम्हीं गुप्त गोष्टी ठेवूं शकत नाहीं. तुमचाच एक शिपाई, एका रात्रीं म्हणायला लागला कीं, " माशांनी चिकट कागद ( त्यांना पकडायसाठीं ठेवलेला ) जिंकलाय्. " आतां त्याचे हे शब्द तमाम देशाला ठाऊक झाले आहेत. त्यांनी त्याच्यावर एक गाणं रचलंय्. माशांनी चिकट कागद जिंकलाय्. कर्नल तुम्हीं गुप्त गोष्टी राखूं शकत नाहीं. "

खाणीच्या बाजूनं शिटीचा कर्कश आवाज येऊं लागला. वाऱ्याच्या झुळकीसरशीं कोरड्या बर्फाचे तुकडे खिडक्यावर उधळले.

ऑर्डननं सांखळीवरचं सोनेरी चिन्ह हाताळलं. तो सावकाशपणं म्हणाला " सर कांही झालं तर आतां कांही बदलणार नाहीं. तुमचा नाश करून तुम्हांला हांकलून देण्यांत येईल. " त्याचा आवाज अगदीं मंद झाला होता. " सर, जनतेला आपण जिंकलं गेलेलं सहन होत नाहीं, व त्यामुळं जनता अजिंक्य राहील. " स्वतंत्र माणसं युद्ध सुरू करूं शकत नाहींत पण एकदां युद्ध सुरूं झालं कीं त्यांचा पराभव झाला तरी ते झुंजत राहतील. पुढाऱ्याचे अनुयायी, माणसांचे कळप-या गोष्टी करूं शकत नाहीं, आणि म्हणूनच असलीं कळप-वृत्तीचीं माणसं लढाया जिंकतात, पण स्वतंत्र माणसं युद्धं जिंकतात. सर हें खरं आहे याचा तुम्हांला अनुभव येईल. "

लॅन्सर ताठ उभा होता. " माझा हुकूम स्पष्ट आहे. " अकरा वाजेपर्यंत वेळ देण्यांत आली होती. मी ओलिस ठेवून घेतलेत, जर कां अत्याचार झाला, तर त्यांचा शिरच्छेद करण्यांत येईल. "

डॉक्टर विंटर कर्नलला म्हणाला. " पण आपले हुकूम कुचकामाचे आहेत हें कळूनसुद्धां तुम्हीं हुकूम सोडला. '

लॅन्सरची मुद्रा उग्र दिसूं लागली. " कांही हुकूम असला तरी तो मी पाळणारच. पण तुमच्या एका जाहिरनाम्यानं अनेकांचे प्राण वांचतील.

मादामनं काकुळतीनं विचारलं. " ही काय निरर्थक गडबड चालली आहे तुमची, मला तरी कळूं द्या ! "

" निरर्थकच बडबड आहे ही. "

" पण ते मेयरला पकडूं शकत नाहीं. तिनं त्याला समजावलं.

ऑर्डन तिच्याकडे पाहून हंसला मात्र. " नाहीं. ते मेयरला पकडूं शकत नाहीं. मेयर ही स्वतंत्र लोकांची कल्पना आहे. तिला अटकावतां येणार नाहीं.

दूरवर स्फोट झाल्याचा आवाज ऐकूं आला. त्याचा प्रतिध्वनी टेंकड्यावर आदळला व ऐकूं आला. कोळशाच्या खाणीतील शिटी कर्कशपणं किंचाळत होती. क्षणभर ऑर्डन गंभीर होऊन उभा राहिला व नंतर त्यानं स्मित केलं दुसऱ्या स्फोटाचा आवाज ऐकूं आला–हा आवाज मघांपेक्षां बराच मोठा व जवळून आला होता. पुनः त्याचा प्रतिध्वनी डोंगरावर आदळून परत फिरला. ऑर्डननं घड्याळाकडे पाहिलं, व नंतर घड्याळ निसाखळी काढून डॉक्टर विंटरच्या हातांत दिली. " कायरे ते माशांचं गाणं काय म्हणत होतास ? " माशांनी चिकट कागद जिंकलाय. " विंटर म्हणाला.

ऑर्डननं हांक मारली. " ॲनी ! लगेच बेडरूमचं दार उघडलं. मेयरनं विचारलं. " काय ग तूं चोरून ऐकत होतीस वाटतं ? " " यस सर " ॲनी गुटमळत म्हणाली.

इतक्यांत आणखी एका स्फोटाचा आवाज ऐकूं आला. लांकूड पिंजल्याचा, कांचा खळकन् फुटल्यांचा आवाज मागोमाग आला व पहारेकऱ्यांच्या मागचं दार एकदम उघडलं. मेयर म्हणाला. " ॲनी, मादामला हवी आहेस–तिला तुझी जरूरी आहे तोपर्यंत तिच्या जवळ रहा. तिला एकटी सोडूं नको. " त्यानं मादामभोंवतीं हात घालून, तिला जवळ ओढलं व तिच्या कपाळाचं चुंबन घेतलं नंतर सावकाश पावलांनी, लेफ्टनं प्रॅकल उभा असलेल्या दाराकडे तो गेला. दारांत उभं राहून, वळून तो डॉक्टर विंटरला म्हणाला. " क्रितो, मी ॲस्क्लिपियसला एक कोंबडा द्यायचा

नवस केला आहे व तो फेडायचा राहिलाय् " तो मृदुस्वरांत म्हणाला. " नवस फेडायची तुला आठवण राहील ना ? "

विंटरनं उत्तर देण्यापूर्वी क्षणभर डोळे मिटून घेतले व नंतर म्हणाला. " नवस फेडला जाईल. "

ऑर्डन आनंदून म्हणाला. " तें मी विसरलों नाहीं. तेवढं मला अचूक आठवलं " त्यानं प्रॅकलच्या खांद्यावर आपला हात ठेवला, लेफ्टनंटनं आपलं अंग चोरलं.

विंटर सावकाश मान हालवीत म्हणाला. " होय तुला आठवलं. ऋण फेडलं जाईल. ! "